पुस्तकाचे नांव: विषामृत

प्रकार : कथा

लेखिका : आनंदिनी

anandini2503@gmail.com

मुखपृष्ठ. अंतर्गत सजावट :

Last Bench Design

प्रकाशन : ई साहित्य प्रतिष्ठान®

esahity@gmail.com

www.esahity.com

ई साहित्य प्रतिष्ठान ही कवी, लेखक व वाचकांनी मिळून चालवलेली चळवळ आहे. नवीन उदयोन्मुख लेखकांसाठी हे व्यासपीठ आहे, आणि खेडोपाडी व देशोदेशी पसरलेल्या मराठी वाचकांसाठी वाचनाचे साधन आहे. ई पुस्तके. आता स्मार्टफ़ोनवर डाऊनलोड करून वाचता येतात. आपण या चळवळीचे भाग होऊ शकता. आपल्या ओळखीच्या लोकांचे ई मेल पत्ते पाठवा. त्यांनाही विनामूल्य ई पुस्तके पाठवू. नवीन वाचक आणि नवीन लेखकांचे या चळवळीत स्वागत आहे

माणूस नावाच्या एका अवाढव्य, अनाकलनीय यंत्राचा सेफ़्टी व्हाल्व्ह शब्द आणि संवाद हा आहे.

---वपु

# कथानुक्रम

या सर्व कथा, यातील पात्रे, नावे  काल्पनिक आहेत.

पण त्यातली नाती,

जसे सासू- सून, नवरा- बायको, आई -बाळ,

त्यातल्या पक्क्या गाठी,

त्यातले प्रेम कसे काल्पनिक असू शकते !!

# विष की अमृत?

नमिताच्या लग्नाला एक दिडच महिना झाला होता. ती हळू हळू सासरी रुळायला लागली होती. शौनकचे तिच्यावर खूप प्रेम होते. नमिता एमबीए झालेली, तिला करियरची आवड होती. त्यातून थोड्या मुक्त विचारांच्या कुटुंबातून आलेली. थोड्याच दिवसांत नोकरी करण्याचा विचार तिच्या मनाने घेतला. आपल्या आयुष्यात काही नवीन घडवावे, काही अचीव्ह करावे असे तिला वाटू लागले.

तिच्या सासूबाई, म्हणजे शौनकची आई मात्र जुन्या विचारांची होती. ती म्हणायची, “सुनबाई, शौनकला भरपूर पगार मिळतो, मग तू कशाला

नोकरी करायला हवीस? घरच छानपैकी सांभाळ. ती पण एक प्रकारची नोकरीच आहे. त्या बदल्यात आपल्याला आपल्या कुटुंबाकडून खूप प्रेम मिळते. आणि तोच आपला पगार समजायचा."

एकदा नमिताने तिची जीन्स आणि टॉप घातला, आणि बाहेर फिरायला चालली. सासू बाई म्हणाल्या, "बाळ नमू, हे तुला छान दिसत आहे. पण तू बहुधा हळदीकुंकवाला चाललीस ना? मग साडी नेसून, सर्व दागिने घालून सजून जावे. हे असे कपडे अशा कार्यक्रमाला शोभणार नाहीत. शिवाय तू पण जास्त सुंदर दिसशील साडीत, या कपड्यांपेक्षा." नमिताला रागच आला. पण ती निमूटपणे साडी नेसून गेली.

नमूचे केस छान लांब होते, आणि ती सदा ते मोकळे सोडत असे. एकदा सासूबाई म्हणाल्या "नमू, किती छान केस आहेत तुझे! आणि तू मोकळया केसात अजून छान दिसतेस, तुझे सौन्दर्य आणखी खुलून दिसते." सासूबाईंनी असे म्हणताच नमूच्या मनात संशयाची पाल चुकचुकली. आता या काहीतरी सांगणार आणि आपली अजून एक हौस बंद होणार. तसेच झाले. त्या पुढे म्हणाल्या, "पण तुला एक सुचवू का? या सुंदर केसांची छान सैल

वेणी घाल. आणि आपल्या दारातील मोगरा आणि अबोलीचा गजरा करून घाल. फार शोभेल हो तुला."

नमिताला या अशा सूचनांचा राग यायचा. सासूबाई आपल्याला सोळाव्या शतकातली काकूबाई करणार हे तिच्या लक्षात आले. पण ती राग गिळून गप्प बसत असे. उलट उत्तर दिले की सासूबाई जाम रागवीत. आईने शिकविले होते की नवऱ्याजवळ कोणतीही कुरकुर करायची नाही, सासरच्या मंडळींची तर नाहीच नाही. त्यामुळे तोंड दाबून बुक्क्यांचा मार सहन करावा लागे.

त्यातच एकदा नवीन संकट आले. सासूबाई घरातच बाथरूममधे घसरून पडल्या. त्यांचा पाय फ्रॅक्चर झाला होता. त्यांना खूप दुखत होते, सहन होत नव्हते. शौनकला वडील नसल्याने आईच त्याचे सर्व काही होती. तो ही खूप हळहळला. घरातले सर्व काम आता नमितावर येऊन पडले. स्वयंपाक, शौनकचा नाश्ता, डबा. शिवाय सासुबाईंना आंघोळ घालण्यापासून ते त्यांना रात्री बेड वर झोपवण्यापर्यंत सर्व काही तिलाच पहावे लागे. त्यांचा वेगळा नाश्ता, त्यांना जास्त मसालेदार पदार्थ आवडत नसत. औषध, पथ्य-

पाणी, घराची स्वच्छता. शिवाय त्यांना पाहायला येणा-जाणाऱ्याचे चहा पाणी, जेवण सर्व पहावेच लागे. ती खूप दमू लागली. शिवाय शौनकचीही मर्जी सांभाळावी लागे.

एकदा तिची मैत्रीण तिला भेटायला आली. तिने नमिताची दिनचर्या पाहिली आणि म्हणाली “काय अवस्था झालीये तुझी नमे? कशी होतीस तू? आणि काय झालीयेस आता? बाहेर पड यातून! जरा मोकळा श्वास घे!”

हे ऐकताच नमिताला भरून आले. ती रडायला लागली. तिने तिला खटकलेल्या सर्व गोष्टी मैत्रिणीला सांगितल्या. त्यात भर म्हणूनच की काय मैत्रिणीने सल्ला दिला “सरळ वेगळी रहा”.

ती गेल्यावर नमिताच्या डोक्यात वेगळे रहाण्याचे विचार थैमान घालू लागले. पण शौनक याकरिता कधीही तयार होणार नव्हता. कारण लग्नाच्या पहिल्याच दिवशी त्याने तिला संगितले होते की “आई म्हणजे माझा प्राण आहे. तिला तू व्यवस्थित सांभाळ. माझ्यासाठी म्हणून आणखी काहीही करू नकोस”. त्यातून सासुबाईंची ही अवस्था. मग तर असे

बोलल्यावर तर शौनकने नमिताला कायमचे माहेरी धाडायला कमी केले नसते. तिला फार अडकल्यासारखे होत होते. ते काही नाही. तिने ठरवले की सासूबाईंचा पाय बरा झाला की आपण नोकरी करायची. तीन आठवड्यानंतर प्लास्टर काढायचे होते. एकदाचा तो दिवस उजाडला. नमिता खूप खुश होती, सासूबाई बऱ्या होतील म्हणून नाही, तर तिची सुटका होणार म्हणून.

पण घडले काहीतरी वेगळेच. प्लास्टर काढल्यानंतरदेखील त्यांना चालता येईना. एक्सरे काढला तर डॉक्टर म्हणाले “यांचे थोडे वय झाल्यामुळे हाडांची झीज झाली आहे. त्यांना अजून किमान  सहा महीने तरी चालता येणार नाही. किंवा त्यानंतरही काही सांगता येत नाही. कदाचित कधीच चालणे जमणार नाही. यांच्या पायाची काळजी घेतली, रोज व्यायाम करवला तर कुठे किंचितशी शक्यता आहे”

नमिता हे ऐकून पार गळून गेली. तिची स्वप्ने धूळीस मिळाली होती. ती हताश झाली होती. या जर कधीच चालल्या नाहीत तर आपले आयुष्य असेच बरबाद होईल. तशा सासूबाई इतर बाबतीत चांगल्या हेल्दी होत्या.

किमान अजून वीस पंचवीस वर्षं तर काढतीलच. तोवर आपण म्हातारपणाला पोहोचू.

हा विचार करत करत अखेरीला तिने एक वाईट कृत्य करायचे ठरवले. तिने मनाशी पक्के ठरवले की “सासूबाईंना संपवायचे”. पण कसे? एक वैद्य तिच्या परिचयाचे होते. अगदी वडलांसारखे. ती त्यांच्याकडे गेली. व त्यांना विश्वासात घेऊन त्यांना सर्व परिस्थिति सांगितली. आणि तिची इच्छासुद्धा सांगितली. वैद्यबुवा नमूला आपल्या मुलीसारखीच मानीत. थोडा विचार करून त्यांनीसुद्धा तिची इच्छा मान्य केली. पण या कामाचे दहा हजार रुपये लागतील असे त्यांनी संगितले. ती तयार झाली. ते म्हणाले “उद्या दुपारी ये.”

“ठीक आहे” म्हणून ती एका आसुरी आनंदात घरी गेली.

सारे काम आटोपून ती दुपारी वैद्यांकडे गेली. त्यांनी तिला एक छोटा डब्बा दिला आणि एक तेलाची बाटलीही दिली. म्हणाले “नीट ऐक, या डब्यात विष आहे. हे तू दररोज एका वेगवेगळया गोड पदार्थामधून एक

चमचा तुझ्या सासूबाईंना दे. असे दीड महिना दे. हो पण तो पदार्थ त्यांच्या आवडीचा असायला हवा. त्या जेवढे मनापासून तो पदार्थ खातील, तेवढा या विषाचा परिणाम चांगला होईल. हे एक मंद परिणामकारक विष आहे याचा परिणाम सहा महिन्यानंतर दिसेल. तोपर्यन्त तू त्यांच्या आवडीचे पदार्थ त्यांना खायला घाल. आणि त्यांच्या मर्जीप्रमाणेच वाग. आणि या बाटलीत तेल आहे. याने त्यांचा पाय तू चोळत जा. त्याला मालीश कर. या सर्वाचे कारण की तू दिलेल्या विषाचा परिणाम सहा महिन्याने तर होणार आहेच. पण तुझ्यावर कोणालाही संशय पण येणार नाही. म्हणूनच सांगतो. एक महत्वाची गोष्ट ध्यानात ठेव की त्या जेवढ्या आनंदी राहतील तेवढे त्यांचे रक्ताभिसरण वाढेल आणि या विषाचा परिणाम लवकर होईल. याबद्दल कोणालाच अवाक्षरही सांगू नकोस. नाहीतर तू आणि मी दोघेही अडकू. सहा महिन्यांनंतर त्यांना प्रथम ताप येईल मग दहा ते बारा दिवसात विषय संपेल."

नमू त्यांचे आभार मानून, त्यांना पैसे देऊन बाहेर पडली. खूप खुश होती मनात. दुसऱ्या दिवशी तिने सासूबाईंना मोठ्या प्रेमाने उठवले, म्हणाली "आई, आज काय गोड बनवू तुम्हाला नाश्त्याला?"

त्या म्हणाल्या, "का ग , आज काय विशेष आहे का?".

ती म्हणाली "नाही, असेच विचारले."

त्या हसून म्हणल्या "खीर कर शेवयांची, आणि जरा जास्त गोड कर, मला तशीच आवडते"

तिने सासूबाईंना अगदी मनापासून आंघोळ घातली, तेल लावून वेणी फणी केली. आणि जरा मोकळया हवेला बाल्कनीत बसवले. तिने खीर बनवली आणि लॉकरमध्ये ठेवलेल्या त्या डब्यातून एक चमचा विष खीरीत मिसळले आणि खीर सासू बाईंना दिली.

त्या ती खीर पिऊन खुश झाल्या, म्हणल्या "नमू, आज काहीतरी वेगळाच मूड दिसतोय तुझा, मलाही छान वाटतेय बरे का "

दुपारी जेवण झाल्यावर तिने त्या तेलाने त्यांचा पाय चोळून दिला, त्यांना बरे वाटले. त्या रात्री सासू बाई खूप गाढ झोपल्या. नमूहि खुश होती.

दुसऱ्या दिवशी तिने त्यांना विचारून शिरा केला. ती त्यांना रोज एक नवा गोड पदार्थ बनवून त्यात विष मिसळून देत असे. आता पाय चोळण्यासोबतच त्यांना ती गीता, रामायण असे ग्रंथ वाचून दाखवीत असे. त्यामुळे त्या खूप आनंदी राहू लागल्या. आणि नमू सुद्धा त्याचा आसूरी आनंद घेत होती.

एकदा ती त्यांना नवीन साडी घेऊन आली. एकदा व्हील चेअर वरुन देवळात घेऊन गेली. त्याही तिला मधून मधून छान कथा सांगू लागल्या. एकदा त्यांची मैत्रीण त्यांना भेटायला आली होती.  नमू चहा घेऊन येताच म्हणल्या, “नमू, ही माझी बाल मैत्रीण आहे बघ,चिंगी”.

नमू बाहेर उभे राहून सर्व ऐकत होती. त्या चिंगीला सांगत होत्या, “माझी नमू खूप गुणाची आहे, माझी खूप सेवा करते, रोज माझ्या आवडीचे पदार्थ करून खायला देते, औषधे वेळेवर देते, माझा पाय चोळते. ही बघ

मला तिने नवी साडी आणली आहे. देवाने नवरा लवकर घेतला, मुलगी दिली नाही, म्हणूनच की काय अशी सून मुलगी बनून माझ्या घरी आली.”

नमुला उगाचच अपराधी वाटू लागले. पण तिने जास्त विचार केला नाही. अजून एकच आठवडा विष द्यायचे बाकी होते. मग एकदा चिरोटे, एकदा गुलाबजाम, एकदा रसगुल्ला, एकदा बेसन लाडू, एकदा नारळ बर्फी, एकदा दूधी हलवा आणि शेवटी बासुंदी करून तिने ते विष संपवले.

दीड महिना संपला. पण का कोणास ठाऊक, तिला हृदयाच्या एका कोपऱ्यात अपराधी असल्यासारखे वाटत होते. ती सासूबाईंची सेवा मनापासून करत होती. सासूबाईपण तिच्यावर खूप माया करीत होत्या. एकदा ती मीरा बाईची कथा सासूबाईंना वाचून दाखवत होती, तर त्यात प्रसंग होता की “स्वतःच्या भावाने मिराबाईला विष दिले आणि ते श्रीकृष्ण भक्तीने अमृत झाले”.

नमूला अश्रू अनावर झाले. ती सासूबाईंच्या मांडीवर डोके ठेवून जोरात रडू लागली. काय बोलावे काही कळेना. तिला खूप अपराधी वाटू लागले

होते, आणि त्यामुळे ती आजारी पडली. डॉक्टर घरी आले, नमूला तपासून औषध देऊन गेले.

बाहेर सासूबाई डॉक्टरांशी बोलताना नमूच्या कानी पडले. “डॉक्टर, माझ्या मेली म्हातारीची सेवा करून करून माझी पोर आजारी पडली हो. माझ्या बाळाला लवकर बरे करा. बाळ कसले हो! ती तर माझी आईच आहे! तीच माझ्या आईप्रमाणे काळजी घेते माझी. पहा आजच तिच्या प्रयत्नांनी माझा निर्जीव झालेला पाय सुद्धा हलतो आहे. आणि आजच ती आजारी पडली”

डॉक्टर म्हणाले, “मावशी काळजी करू नका, त्या टेंशन ने आजारी पडल्या आहेत.” आणि डॉक्टर निघून गेले.

सासूबाई देवाचा धावा करीत होत्या म्हणल्या,” देवा ,नक्की नमूने माझेच टेंशन घेतले असणार. नको रे बाबा माझे ओझे अजून तिच्यावर लादू. घे बाबा लवकर बोलावून तुझ्याकडे मला. म्हणजे पोरीला माझा त्रास नाही रे राहणार.”

नमूला फार वाईट वाटले ते ऐकून. तिला बरे वाटू लागल्यावर ती दिवसातून दोन तिन वेळा सासूबाईंचा पाय चोळू लागली. त्यांच्या पायात सुधारणा दिसू लागली. त्या हळू हळू पाय जमिनीवर टेकवू लागल्या आणि तीनच महिन्यात त्या चालू लागल्या. आता त्या नमुला कामात मदत करीत होत्या. हळू हळू बाहेर जात होत्या.

अशातच नमूला दिवस गेले. मग तर त्या आनंदाने अक्षरश: नाचल्या आणि म्हणल्या “नमू अशी गोड बातमी ऐकून नाचायचे होते, म्हणूनच माझा पाय लवकर बरा करुन दिलास वाटते!!” नमू लाजली.

पण ती सतत खिन्न असायची. एक फार मोठी अपराधी सल तिच्या मनाला लागून राहिली होती. सासूबाई तिला जागेवरून हलून देत नव्हत्या. कधी बदामाची खीर, कधी समोसे, कधी ढोकळा, कधी मटार पनीर असे खूप काही पदार्थ करून त्यांनी नमूला खाऊ घातले. नमूची खूप काळजी घेत होत्या. नमूचाही एव्हाना त्यांच्यावर फार फार जीव जडला होता. आणि स्वत: स्वार्थासाठी केलेल्या अपराधाची बोच मात्र मनाला फार त्रास देत होती .

सासूबाई मात्र फार खुश असायच्या. एकदा नमूला म्हणाल्या “नमू आता लवकरच तुला तिसरा महिना संपणार आहे, त्याआधी आता तुझी चोर चोळी करायला हवी बरे का! मी तुझ्या आईलाच बोलावून घेईन म्हणते, आणि मग चौथ्या महिन्यात हळूहळू बाळाची नाजूक हालचाल पोटात जाणवायला लागते, आणि आपोआपच आपला त्या कोवळया जिवाची माया फुटू लागते. मग हळूहळू त्याच्याशी गप्पा मारत जा. मग बघ, बाळाला आईपेक्षा जास्त प्रिय काहीच वाटत नाही, जसा माझा शोणू, अगं अगदी लग्न होईपर्यंत हा मला जेवण भरवायला सांगायचा. आता तू त्याच्या आयुष्यात आली आणि त्याला मिळणाऱ्या प्रेमात अजूनच भर पडली, म्हणूनच मला तुझा खूप अभिमान आहे बाळा. मग सातव्या महिन्यात ओटीभरण करायचे असते, तेव्हा तर मी तुला खास गडद हिरव्या रंगाची पैठणीच घेणार आहे. आणि मग तू माहेरी जाशील बाळंतपणाला. मी खूप एकटी होईन ग तेव्हा, तुझी खूप सवय होऊन गेलीये बघ, कोण जाणे मी कशी राहेन तुला सोडून,” हे ऐकून तर नमिता मनातल्या मनात अजूनच कोसळली.

दोन तीन दिवसांनी सकाळी सासूबाईंना थोडी कणकण वाटू लागली. आणि दुपारी थंडी वाजून फणफणीत ताप आला. आता मात्र नमिताच्या पायाखालची जमीनच सरकली. ती घाबरून गेली. तिला वैद्य बुवांचे शब्द आठवू लागले.

फक्त १० ते १२दिवस.

फ़क्त १० ते १२ दिवस.

मग सगळा विषय संपेल.

मग सगळा विषय संपेल.

ती स्वतःला अपराधी समजत होती. ती सासू बाईंजवळ जाऊन बसली. ताप मी म्हणत होता. ती त्यांचा हात हातात घेऊन रडू लागली. “सासूबाई, मला माफ करा, मी चुकले”.

सासूबाई म्हणाल्या “ए वेडाबाई अशी रडतेस काय, मला काही नाही झाले ग, पण तुला इतके वाटतेच आहे ना तर एक काम कर, तुझे ते वैद्य

बुवा आहेत ना, ज्यांनी दिलेल्या तेलाने माझा पाय बरा झालाय, त्यांच्याकडे जा आणि आण काहीतरी औषध”

डोक्यात वीज चमकल्याप्रमाणे नमिता उठली आणि चालू लागली. थेट वैद्य बुवांच्या घरी गेली आणि रडू लागली. म्हणाली “वैद्य बुवा, मी चुकले हो. मी रागाच्या भरात काय करून बसले. माझ्या सासूबाई खूप खूप चांगल्या आहेत हो. मला त्यांना गमवायचे नाही. त्यांना ताप आलाय. आपण दिलेल्या विषाचा परिणाम झालाय बहुधा. त्यावर काहीतरी उतारा द्या हो, कृपा करा माझ्यावर”

वैद्यबुवा जोरजोरात हसायला लागले आणि म्हणाले “अग वेडे! त्यांना साधा ताप आला असेल. तू दिलेल्या विषामुळे नाही. कारण तू त्यांना विष दिलेच नाहीस कधी. अगं, त्या डबीत ना साखर, शतावरी, केशर आणि वेलदोडयाची पूड होती फक्त. जी मी तुला विष म्हणून दिली होती. पोरी, विष तर तुझ्या मनात होते. आणि मी दिलेल्या डबीतली पावडर हीच त्यावरची मात्रा ठरली. तुझ्या मनातले विष उतरले. बास! माझी वैद्यकी आणि माणुसकी दोन्ही भरून पावले बघ.”

नमू आश्चर्याने आनंदाश्रू ढाळीत म्हणाली “खरेच? ते विष नव्हते? माझी शपथ घेऊन सांगा! ते विष नव्हते? आणि ते तेल? त्याने तर त्यांचा पायसुद्धा पूर्ण बरा झालाय. त्या आता चालतात, फिरतात. खरेच ना हो ते विष नव्हते?”

त्यावर वैद्य उत्तरले “पोरी ते विष तर नव्हतेच, पण ते तेल तर साधे महानारायण तेल होते. तू त्यांची मनापासून सेवा केलीस. वाईट हेतूने का होईना, पण सारे  मनापासून केलेस. त्याचं फळ म्हणजे त्या बऱ्या झाल्या. पोरी विष आपल्या मनात असते ग. बहिणाबाई फार मौलिक गोष्ट सांगतात

“मन जहरी जहरी। ,
त्याच न्यारं ते तंतर ,
अरे ईचू साप बरा,
त्याले उतारे, मंतर.”

आपण कोठे चुकतो आहोत हे पाहिले आणि थोडे मोठ्यांच्या कलाने घेतले की सारे काही सोपे होते बघ. आणि दुसऱ्याचे मन जाणून त्या व्यक्तीला आनंदी ठेवण्यासाठी केलेली कृती म्हणजेच आपला आनंद मिळवणे

होय. तू त्यांच्या भावना न जाणताच त्यांची एक वाईट प्रतिमा तुझ्या मनात निर्माण केलीस आणि काय करायला चालली होतीस. पण तू त्यांना प्रेम दिलेस. त्यांची सेवा केलीस, त्यांना जीव लावला, तेव्हाच तुला त्यांचा खरा स्वभाव कळाला ना!! पोरी, प्रेमाने जग जिंकता येते बघ. पण प्रेम देऊन त्याच्या बदल्यात काहीही न मिळण्याची भावना ठेवलीस ना तर तुझ्याइतकी सुखी फक्त तूच बाकी कोणी नाही. आता जा, घरी जा. आणि स्वच्छ मनाने नवीन सुरुवात कर. आणि हो! हे घे तुझे दहा हजार रुपये आणि हे तसेच ठेव अमृताचा ठेवा म्हणून"

नमू परमानंदाने घरी गेली. आनंदाश्रू डोळ्यात होतेच. घरी जाताच तडक स्वयंपाक घरात गेली, एक ग्लास दूध भरून घेतले आणि देवासमोर ते ठेवून, देवाला मनापासून मागणे मागितले "देवा, माझ्या सासूबाईंना लवकर बरे कर," आणि ते दूध नेऊन सासूबाईंना प्यायला दिले आणि म्हणाली " आई, वैद्य बुवांनी यात टाकायला अमृत शर्करा दिली आहे "आणि त्या दूधासोबत एक क्रोसिनची टॅब्लेट घेताच सासूबाई ठणठणीत बऱ्या झाल्या.

# एक वेगळा प्रवास

प्राची पुण्याहून आग्र्याला तिच्या मावशीकडे सुट्टीसाठी चालली होती. तेथून ती व मावशीच्या मुली लीना आणि लीली कुल्लू , मनाली , सिमलाला जाणार होत्या. तिला मुंबईहून चार वाजताची लश्कर एक्सप्रेस पकडायची होती. पुण्याहून ती दुपारी बारा वाजता सर्व समान घेऊन ट्रेननेच निघाली. रिजर्वेशन तर आधीच केले होते. त्यामुळे जागेचा प्रश्न आपोआपच मिटला. प्राची अतिशय धीट आणि मनमिळाऊ मुलगी होती. प्रवास सुरू होताच तिने सामान जागी ठेवून पर्स मधील पुस्तक “इम्पॉर्टेन्स ऑफ बीइंग अरनेस्ट” वाचायला घेतले. ती पुस्तक वाचण्यात खूप तल्लीन होती. खूप वेळाने

तिच्या लक्षात आले की समोरचा एक तरुण तिला न्याहाळत होता. त्यामुळे ती डिस्टर्ब झाली. लक्ष नाही असे दाखवूनही ती पुस्तकाच्या कोपऱ्यातून हळूच पाहत होती. तरीही तो तिलाच न्याहाळत होता. तो खूप देखणा होता. उंच, एकदम गोरा, सरळ नाक आणि किंचित घाऱ्या डोळयांचा. फिक्कट गुलाबी शर्ट घातलेला आणि चश्मा.  खिशात मोबाइल होता आणि कानात हेडफोन लावलेला, बहुधा गाणी ऐकत होता. तिने जाणून बुजून दुर्लक्ष केले आणि वाचत राहिली.

पंधरा वीस मिनिटांनी तिने परत हळूच पहिले तर तो तिलाच न्याहाळत होता. मग त्याने खिशातून मोबाइल काढला. पिवळया रंगाचा मोबाइल होता त्याचा. मुद्दामच का चुकून, कोणास ठाऊक पण मोबाइलला जोडलेली त्याच्या हेडफोन ची वायर निसटून खाली पडली आणि गाणे जोरात वाजू लागले.

“ना कजरे की धार,<br>
ना मोतीयोंके हार,<br>
ना कोई कीया  शृंगार,

फिर भी कितनी सुंदर हो,
तूम कितनी सुंदर हो”

तिला उगाचच वाटले की गाणे तिच्यासाठीच त्याने जोरात वाजवले. तिने पाहिले तर तो तिच्याकडे पाहून गालातल्या गालात स्मित हास्य करीत होता. तिला त्याचा प्रचंड राग आला होता. प्राची खूप डिस्टर्ब झाली होती. अजून बराच वेळ होता मुंबई यायला. आणि इतर लोकही हे निरीक्षण करीत होते. त्यामुळे तिला अजूनच ओशाळल्यासारखे झाले.  ती सरळ डोळे मिटून बसून राहिली.  झोप  लागणे तर अशक्यच होते. पण आता तर डोळे उघडून ही तो अजून पाहतोय का ते पाहता येत नव्हते. एकदा तिच्या मनातही आले की सरळ त्याला विचारावे की कधी मुलगी पहिली नाही का म्हणून असे निरखतोयस. पण पुढच्याच क्षणी हाही विचार आला की तो जर पटकन म्हणाला की तू माझ्याकडे पाहिल्याशिवाय तुला हे कळाले का की मी तुला पाहतोय ते, मग आपल्याच  इज्जतीचा फालूदा होणार. त्या पेक्षा गप्प रहाणे चांगले. अजून अर्धा तास तर लागेल मुंबई यायला.

एकदाचे मुंबई स्टेशन आले. ती भराभर तिचे सामान घेऊन उतरली. तिच्याकडे एक सॅक, पर्स आणि एक पाण्याची बॉटल असे समान होते. ते घेऊन ती घाई घाईने उतरली. दोनच वाजले होते अजून दीड तास तरी स्टेशनवरच थांबावे लागणार होते. उतरताच ती स्टेशन जवळच्याच एका हॉटेल मध्ये गेली आणि हलके जेवण घेतले. पाण्याच्या दोन बिसलेरी बॉटल घेऊन ती परत स्टेशनवर आली.

जवळ जवळ पावणे तीन वाजले होते. ती तेथेच एका बुक-स्टॉलवर गेली आणि परत एक पुस्तक विकत घेतले आणि चौकशीच्या खिडकीजवळ गेली. लश्कर एक्सप्रेस? “देवीजी ,ठीक सव्वाचार बाजे छुटेगी  प्लॅटफॉर्म नं. 5 से.

धन्यवाद म्हनून ती प्लॅटफॉर्म नं 5 वर येऊन थांबली. अजून पूर्ण अर्धा तास होता. तोच तिला परत “तो” समोर दिसला. तिला धस्स झालं. ती तेथून निघाली. तिने विचार केला याला चुकवावे. पण तो तिच्या पाठीपाठी येतोय असे तिला उगाच जाणवत होते. ती एका कोपऱ्यात जाऊन थांबली. तिथे एक फ्रूट स्टॉल होता. तिथे गेली. आणि तिने पावशेर द्राक्षे विकत

घेतली. प्राची फळवालीला म्हणाली “मावशी, त्या पाण्यात धुवून द्या ना द्राक्षे, म्हणजे गाडीत बसून खाता येतील.”

मावशीने द्राक्षे धुवून एका कॅरिबॅगमध्ये घालून तिला दिली. ती वळली तोच तो ही तिथे आलेला. आता मात्र हद्द झाली. ती लगबगीने तेथून निघाली आणि दूर जाऊन एक वेटिंग चेअरमध्ये उगाच पुस्तकात तोंड घालून बसली. तोही तिकडे येताना तिला दिसला. तिने घाईने आपले सामान शेजारच्या खुर्चीत ठेवले. जेणेकरून तो तेथे बसू नये.

ती जर धीट होती, तर ती इतकी का डिस्टर्ब होत होती? तो त्याच लाइन मध्ये येऊन तिच्या सामानाच्या शेजारच्या खुर्चीवर बसला. ती त्याच्याकडे लक्ष नाही दाखवत तिच्या सामानावर ठेवलेल्या द्राक्षाच्या पिशवीतून द्राक्षे काढून खाऊ लागली, की जेणेकरून त्याला वाटावे, ती एकदम रीलॅक्स आहे. पण त्याने तर हद्दच ओलांडली. त्याने पण पिशवीतील द्राक्षे खायला सुरुवात केली. आता मात्र तिला खूप राग आला. 'किती बावळट आहे हा! असे दुसऱ्याच्या वस्तूला न विचारता कसे काय हात लावतो?'

पण ती शांत राहिली. तिने परत पिशवीतून दोन द्राक्षे घेतली. त्यानेही लगेच दोन द्राक्षे घेतली. तिने रागारागात त्याच्याकडे पाहिले. पण तो द्राक्षे खातच होता. तिने परत चार सहा द्राक्षे घेतली. लगेचच त्यानेही एक मोठा झुबका भरून द्राक्षे घेतली.

तिला इतका राग येत होता की तिचा तिळपापड होत होता. स्त्रीला छेडण्याची त्याची ही तऱ्हा भयंकर होती. तिने परत द्राक्षे घेतली व भराभर खायला चालू केली. त्यानेही द्राक्षे घेतली पण तो शांतपणे खात होता. आता शेवटी त्या पिशवीत चारच द्राक्षे राहिली. तिने द्राक्षाकडे पहिले आणि विचार केला आता हा निर्लज्ज मनुष्य एवढीही खाऊन टाकेल.

तोच त्यानेही द्राक्षांकडे पाहिले आणि मग तिच्याकडे पाहिले. मग त्याने ती पिशवी उचलली आणि तिच्या पुढे धरली. तिने ती त्याच्या हातातून हिसकावून घेतली. तो हसला. ती मात्र खूप खूप चिडली होती. तेवढ्यात गाडी आली. आणि ती तिचे सामान, ती द्राक्षाची पिशवी आणि पर्स घेऊन गाडीत जाऊन बसली. तो तिथेच बसून राहिला होता. तेथून तिला न्याहाळत होता.

शेवटी गाडी सुटली. ती त्याच्याकडे पाहत होती.  तो काही तेथून हलला नव्हता.  तिथेच बसला होता, तिला पाहत. गाडी दूर जाईपर्यन्त ती त्याला पाहत होती पण तिला भीती होती की  हा गाडीत पण पाठोपाठ येतो का काय. पण तो नव्हता आला, आणि तिने सुटकेचा श्वास सोडला.

तिने  सॅक जागेवर ठेवण्यासाठी तिने उचलली तर तिला साइडला खोचलेला एक कागद दिसला. तिने घाईने तो उघडला. त्यात लिहिले होते “तुम्ही खूप सुंदर आहात, पाहता क्षणीच मला आवडलात. हेच कारण होते तुम्हाला मी एकटक पाहत होतो. आणि फक्त निरपेक्ष भावनेने पाहत होतो. मला तुम्हाला त्रास देण्याचा कोणताही उद्देश नव्हता  किंवा तुमच्याकडून मला काही हवे होते किंवा तुमच्याशी बोलायचे होते असेही नाही. केवळ मला तुम्हाला पहायचे होते. बास इतकेच. प्रत्येक सौन्दर्य आपलेच व्हावे असे नसते. बहुधा तुम्ही आग्र्याला चाललात, ताजमहाल पहा. फार सुंदर आहे.  पण म्हणून  तो तुमचाच व्हावा एसे तुम्हाला नक्कीच वाटणार नाही. आणि तुम्ही ताजपेक्षाही खूप सुंदर आहात. तुमचा प्रवास सुखाचा होवो” खाली नाव, मोबाइल नंबर काहीच लिहिले नव्हते.

तिला उगाचच खट्टू वाटू लागले. तिने त्याच्याबद्दल थोडावेळ का होईना पण चुकीचा विचार केला होता. पण त्याने तिच्या पिशवीतील द्राक्षे निर्लज्जसारखी खाल्ली या गोष्टीचा तिला खूप राग आला होता. जाऊ देत. वेडा कुणीकडचा म्हणून तिने ती चिठ्ठी लीना आणि लीली दोघींना दाखविण्यासाठी पर्समध्ये ठेवायला पर्स उघडली. आणि तिला आश्चर्याचा धक्काच बसला आणि ती स्वत:लाच शिव्या देऊ लागली आणि तिला खूप वाईट सुद्धा वाटले आणि स्वत:चा राग ही आला.

कारण तिने घेतलेली धुतलेल्या द्राक्षांची पिशवी तिच्या पर्समध्ये तशीच होती.

# तू माझाच बाळ

चंद्रकांतची पत्नी शारदा पहिल्या बाळंतपणात एका गोड मुलाला जन्म देऊन देवाघरी गेली. बाळ खूप गोंडस होते. त्याचे नाव सोमेश ठेवले. कारण तो फार शांत स्वभावाचा मुलगा होता.  कधीही रडून गोंधळ करणे  हे त्या बाळाच्या गावीच नव्हते. बाळ एक वर्षाचे होईपर्यंत चंद्रकांतच्या आईने मोठ्या काळजीने त्याचे लालन पालन केले. पण नंतर सोमेश इकडे तिकडे पळू लागला. एका जागी थांबेच ना. खूप त्रास देऊ लागला. आणि वयोमानापरत्वे त्यांना त्याच्या मागे पळणे  शक्य होईना.

तिने चंद्रकांतला तिची अडचण सांगितली आणि म्हणाली. “चंदू आता मला काही सोमेश च्या मागे पळणे होत नाही. तर तू दुसरे लग्न कर आणि एक आई आण सोमेशसाठी जी प्रेमाने त्याला सांभाळेल.”

चंद्रकांत ने त्या गोष्टीचा विचार केला. शिवाय त्यालाही आता पत्नीची गरज भासू लागली होती. एकटेपणा त्याला खायला उठत होता. त्याने लवकरच एक मुलगी पाहिली. तिचे नाव भक्ति. ती एक अतिशय गरीब कुटुंबातील मुलगी होती, जिला रोजचं जेवण देखील मिळणे अवघड होते. तिने मामाकडे राहून दहावीपर्यंत शिक्षण घेतले होते. चंदूला ती पसंत पडली आणि वराने एक रुपयाचीही अपेक्षा केली नाही म्हणून भक्तीच्या गरीब आई बाबांनी तिला न विचारताच तिचे लग्न या बीजवराशी लावून दिले.

भक्तीला आता सोमेशचा सांभाळ करायचा होता. चंदूच्या आईने तिला सर्व काही शिकविले. नवीन घरात मिळणारे सुख आणि चंदूचे प्रेम यामुळे भक्ति पार बदलून गेली. ती सोमेशचा छान सांभाळ करीत होती. हळूहळू सोमेश मोठा झाला. त्याला आता छान बोलता येऊ लागले. आईशिवाय तो रहातच नव्हता आणि ती पण त्याला कधीही सोडत नसे. सोमेशचा आईवर

खूप जीव होता. तो आईला त्रास देत नसे. पण नेहमी तिच्या पाठी पाठी रहात असे. भक्तीलाही ते फार आवडे.

एकदा ती माहेरी गेली, तेव्हा सोमेशला घेऊन गेली. सोमेश सारखा तिच्या पाठी पाठी असतो हे पाहून तिच्या आईला राग आला. ती म्हणाली, “भक्ति आता तुलाही तुझे स्वत:चे मूल व्हायला हवे, किती दिवस असे दुसऱ्याचे पोर सांभाळणार आहेस?” भक्तीला आईचा खूप राग आला आणि टचकन तिचे डोळे भरून आले. ती सोमेशला आपल्या छातीशी कवटाळून म्हणाली “माझेच बाळ आहे हे. कोणी दुसऱ्याचे नाही आणि त्याला खूप पापे देऊ लागली.” सोमेशला काहीच कळाले नाही की काय झाले. तो फक्त इतकेच पाहू शकत होता की आई रडत आहे. त्याने आईचे डोळे पुसले आणि आईला एक गोड पापा दिला, आणि म्हणाला “आई रडू नकोस, मी सांगतो थांब आजीला” असे म्हणून तो आजीसमोर गेला आणि म्हणाला “आजी, माझी आई खूप चांगली आहे ग. तिला तू नको रागवूस. मी सांगतो तिला, मग ती सगळे दूध पिऊन टाकेल हट्ट पण करणार नाही. हवेतर मी कान पकडतो तुझ्या समोर. हे बघ उठा बशा पण काढतो. पण आईला रागवू

नकोस. आई पिशील ना दूध? म्हण पिते म्हणून. ही बघ. आजी, म्हणाली आई  की पिते दूध. माझी शहाणी आई." असे म्हणून परत आईच्या मांडीत शिरला आणि तिला चिटकून बसला.

भक्ति सोमेशला घेऊन परत घरी आली. तिने घडला प्रकार सगळा सासूबाईंना सांगितला. त्या म्हणाल्या "भक्ति, बरोबर बोललीस तू की सोमेश तुझेच बाळ आहे. पण आता तो चार वर्षांचा होत आला आहे. मग तुझी आई बोलली ते काही वाउगे नाही.  बाकीचे सोड, पण तुला आता बाळ होऊ देत एक. मग सोमेशला पण भाऊ किंवा बहिणीची गरज आहेच की."

भक्ति लाजली. आणि तिच्या मनाने परत आई बनायचे ठरवले. तिने आपले विचार चंदूला संगितले आणि त्या रात्री त्यांच्या बेडरूमचा लाइट जरा लवकरच बंद झाला.

दोनच महिन्यात भक्तीने गोड बातमी सांगितली. भक्ति आता सोमेशलापण सांगत होती की तुझ्याशी खेळायला एक छोटे बाळ येणार

आहे. ते बाळ म्हणजे तुझा भाऊ किंवा बहीण असणार आहे. सोमेश आतुरतेने बाळाची वाट पाहू लागला.

आता तो एलकेजीत शिकत होता. त्याला शाळेतसुद्धा आईची आणि होणाऱ्या बाळाची आठवण येत असे. तो चित्र काढताना सुद्धा ‘आई, तो आणि बाळ’ असे चित्र काढे. शाळेतून घरी गेला की लगेच ‘आई आई  आणि बाळ बाळ” एवढेच बोलायचा.

तो एकदा म्हणाला, “आई बाळाचे पण माझ्यावर प्रेम आहे का गं? त्याला मी दिसतोय का?”

आई म्हणाली, “सोमू, बाळाला तू दिसत नाहीस, पण तुझे बोलणे ते ऐकत असते, त्यामुळे त्यालाही तू आवडतोसच.” असे आई म्हणताच त्याने आईच्या पोटावर प्रेमाने हात फिरवला आणि “माझे बाळ” म्हणत बिलगला.

हळूहळू दिवस भरले आणि भक्तीची डिलिवरि जवळ आली. तो दिवस उजाडला. तिला कळा येऊ लागल्या. लगेचच दवाखान्यात नेले. लवकरच तिने एका मुलाला जन्म दिला. बाळ पाहून सोमेश खूप खुश होता.  त्याला

म्हणाला "मी दादा आहे. हां! अरे तोच तुझ्याशी गप्पा मारायचो ना तोच. चल ना खेलायला. तुला सांगू का! ना... एकदा ना... आपली आई आहे ना... तिने किनाई दूध पिले नाही तर ना... आपली आजी आहे ना... म्हणजे आपली घरातली नाही... ती तिकडे राहते ना वस्तीवर! ती आईला खूप रागावली, आणि आई रडायला लागली. तू पण न सगळे दूध पित जा. नाहीतर ही आजी रागावते." आणि लगेच तो आईला बिलगला.

आईने पण त्याला जवळ घेतले. सोमेश म्हणाला, "आई बाळाचे नाव काय आहे?" आई म्हणाली "तूच सांग काय ठेवायचे ते. तुला सर्वात जास्त आवडेल ना ते सांग". सोमेश पटकन म्हणाला "आई, आपण बाळाचे नाव "आई" ठेवूया! मला तेच जास्त आवडते". सोमेशचे प्रेम पाहून भक्तीचे डोळे भरून आले. तिने त्याचे नाव 'सोहम' ठेवायचे ठरवले.

शाळेत जाताना सोमेशला आजी तयार करायची. पण तो आईला मिठी मारल्याशिवाय आणि एक गोड पापा घेतल्याशिवाय कधीच शाळेत जात नसे. आईने सांगितले होते की बाळाला पापी द्यायची नाही, नाहीतर बाळ ओकी करते, मग तो दुरूनच त्याच्याशी बोलत असे. शाळेतून आला की

पहिले दफ्तर जागेवर ठेवायचे बूट काढून पाय धुवायचे, आणि आईच्या मांडीवर बसायचे, हे त्याचे अगदी ठरलेले असे. मग शाळेतील र्हाइम्स , स्टोरीज सर्व आईला सांगायचे. आई पण कौतुकाने ऐकत असे.

एकदा भक्तीची आई तिच्याकडे राहायला आली होती. तिने सोमेशचे वागणे पाहिले. तिला त्याचे आपल्या आईबरोबरचे लाडिक वागणे अजिबात आवडत नसे. पण काही बोलल्यास भक्तीला राग येत असे. एकदा सोमेश शाळेतून आला आणि सवईप्रमाणे आईच्या मांडीवर बसला. आणि शाळेतल्या गमती सांगू लागला. तितक्यात बाळ रडायला लागले. पण सोमेशला खाली उतरवून बाळाला घेणे तिला रुचेना. ते पाहून तिची आई ओरडली, “आपले लेकरू रडत ठेवावे, आणि दुसऱ्याचे मिरवावे” असले तुझे वागणे मला अजिबात पसंत नाही. सोमेशला वाईट वाटले. तो उतरला व “बाळाला घे” म्हणाला. आजीच्या अशा कांगाव्याने सोमेश फार कावरा बावरा झाला होता. त्याचे डोळे भरले होते. पण त्याची आईला बिलगायची हिम्मत होईना.

हळू हळू आजीच्या भीतीने त्याने आईच्या जवळ जायचे कमी केले आणि एकटा राहू लागला. पण त्याला आईशिवाय करमत नसे. त्यामुळे तो जाऊन एकदा तरी आईच्या कुशीत झोपायचा. एकदा असाच आईच्या कुशीत झोपला असताना भक्तीच्या आईने पाहिले आणि खसकण सोमेशला  बाजूला ओढले आणि परत ओरडू लागली “या कार्टीला कधी अक्कल यायची देवा, म्हणतात न सवतीचे पोर ते हरामखोर, पण हिला काही अक्कल यायची नाही, थोरला थोरला म्हणून बसेल सगळे गिळून आणि राहू दे तुझा पोरगा मोकळा तसाच, मग कळेल कसे ते, आम्ही कसे मीठ भाकरीला महाग आहोत, तशीच तुझी आणि तुझ्या पोराची गत होणार.”

आईचे हे भाषण ऐकून भक्ती झोपेतून जागी व्हावी तशी जागी झाली. तिला आईच्या बोलण्यातल कडवटपणा न जाणवता तीच सत्य परिस्थिति वाटू लागली.  ती अचानक गप्प गप्प राहू लागली. विचार करू लागली. तिचे कशात लक्ष लागेना.  ना जेवण्यात, ना खाण्यात, ना घरात. सारखे आईचे बोल डोक्यात आणि मनात घोंगावत होते. नकळत कुठे तरी सोमेश तिला परका भासू लागला. ती त्याच दिशेनं विचार करू लागली.

दुसऱ्या दिवशी नेहमीप्रमाणे शाळेत जायच्या आधी सोमेश तिच्याकडे आला आणि तिला त्याने करकचून मिठी मारली. एव्हाना सहजिकपणे त्याला कवटाळणारे तिचे हात आज निर्विकार पणे खालीच राहिले. त्याने पापी दिल्यानंतर खुलणारा तिचा चेहरा त्यादिवशी सुकलेलाच राहिला. सोमेश म्हणाला, “आई , तुला बरे वाटत नाही का गं? बाळाने तुला त्रास दिलाय का? तू हसत नाहीस बोलत नाहीस. ए बाळा, नको हं माझ्या आईला त्रास देऊस. माझी आई आहे ती कळले का? तिला त्रास द्यायचा नाही, नाहीतर तुझ्याशी कट्टीच करेन. आई, मी सांगितलय बाळाला. ते माझे ऐकते. ऐकायलाच पाहिजे. मी दादा नाही का त्याचा! आणि तू माझी गोड आई. चल मी स्कूलला चाललो. तू झोप. टाटा, बाय सी यू”. असे म्हणून परत आईला एक गोड पापा देऊन सोमेश शाळेत पळाला.

भक्तीचे मन मात्र वादळाच्या भोवऱ्यात सापडलेले. सुन्न.... ती सोमेश बरोबर रोजच असा निर्विकार व्यवहार करू लागली. त्याच्या कडे लक्ष देत नसे. सोमेशलाही ते जाणवत असे. तो पण शांत शांत राहू लागला. भक्तीची आई आता तिच्या घरी परत निघून गेली.

सोमेश एकदा त्याच्या बाबांच्या आईला म्हणजेच आजीला  म्हणाला “आजी, आता मी वाईट बनलोय का ग?” आजी म्हणाली “नाही रे माझ्या सानुल्या, तू तर कित्ती गुणी आहेस, तुला कोण म्हणाले का असे?”

सोमेश म्हणाला “नाही ग आजी, आता आई मला जास्त जवळ घेतच नाही. माझ्याशी जास्त बोलत देखिल नाही. माझा राग राग करते.”

यावर आजी म्हणाली “सोमेश बाळा, एक सांगते, आईबद्दल असा विचार कधीच करायचा नाही. आई आपल्या बाळाबरोबर कधीही असे वागत नाही. अरे तिला बरे वाटत नसावे. आणि तुला तसे संगितले तर तुला वाईट वाटू नये, म्हणून ती तुला काही बोलत नसावी. आपल्या आईबद्दल असा विचार केला की देवबाप्पा शिक्षा करतो.”

सोमेशला आजीचे म्हणणे पूर्ण पटले . पण भक्तीच्या मनात मात्र सोमेश विषयी चांगलाच राग बसला.

असे करत करत तीन वर्ष गेली. भक्ति सोमेशला जवळ घेत नसायची आणि तोही हेच समाजायचा की आईला बरे वाटत नाही म्हणून ती अशी करते. आता सोहम सुद्धा तीन वर्षांचा झाला आणि बोलू लागला होता.

एकदा भक्तीने सोमेशला शिळी पोळी खायला दिली आणि सोहमला ताजी पोळी दिली. सोहम त्याला चिडवू लागला “दादाला शिळी पोळी, मला चांगली, मला चांगली, आई माझाच लाड करते फक्त औवा औवा.” त्यावर सोहम हसून म्हणाला, “नाही रे नाही. नाही रे नाही. आई माझाच लाड करते खूप, म्हणून तर तिने आधी माझी पोळी केली कालच. तिला कालपासूनच माझी काळजी वाटत होती. आणि तुला बघ आत्ता दिली औवा ईश्शा” असे म्हणताच सोहम रडू लागला “मला पण शिळी पोळी कर” यावर भक्ति खूप चिडली, पण तिचा सोमेश वरचा राग ती सासूबाई आणि नवऱ्यासमोर दाखवू शकत नव्हती .

एकदा भक्तीने सोमेशला मुद्दाम खूप तिखट भाजी खायला दिली, आणि सोहमला मिठाई. “सोमेश ने एक घास खातच त्याला खूप ठसका लागला. डोळयात पाणी आले आणि त्याने ढसाढस पाणी पिले. परत सोहम त्याला

चिडवू लागला “हय्या रे हयया. तुला मुद्दाम तिखट भाजी दिली. आईने मला मिठाई. आई माझ्यावरच जास्त प्रेम करते. तुला नाही नाही”

तर सोमेश म्हणाला, “मुळीच नाही, आईला मीच खूप आवडतो. म्हणूनच आईने मला तिखट भाजी दिली. तिला वाटते मी शूर व्हावे, बळकट व्हावे म्हणूनच मला तिखट देते ती. आणि भाजी तिखट असली तरी काय झाले माझी आई तर किती किती गोड आहे.” भक्तीला तिच्या वागण्याचे वाईट वाटले .

एकदा तिने सोमेशला मुद्दाम फाटका शर्ट घालायला दिला, आणि सोहम ला नवा दिला. सोहम परत चिडवू लागला “आगगो बाई ढगो बाई! फाटका शर्ट, आम्हाला तर नवा नवा शर्ट, बघ आतातरी कळाले आई माझाच जास्त लाड करते ते” तर सोमेश म्हणाला “चल वेडा कुठला, एवढेही कळत नाही, अरे आता उन्हाळा आहे, आणि माझ्या अंगात हवा खेळती राहावी, मला जास्त गरम होऊ नये म्हणून आईने असा शर्ट दिलाय. बघ आता आई माझ्यावरच जास्त प्रेम करते की नाही.” भक्तीला परत तिच्या वागण्याचे

वाईट वाटले. पण दुसरीकडे आईचे शब्द कानात सारखे गुंजाराव करीत असत.

आज सोमेशचा वाढदिवस होता. त्याला शाळेत खूप छान गिफ्ट्स मिळाले. तो सारी गिफ्ट्स घेऊन घरी आला. आणि आधी आईला दाखविली, मग आजीला दाखविली. भक्तीने त्याला नाराज करायचे ठरवले. मुद्दाम एक रिकामा बॉक्स सुंदर कागदात गुंडाळला आणि सोमेशला भेट दिला. आईने दिलेले गिफ्ट, एकदम खास असणार, म्हणून तो खुशीत होता. भक्ति त्याच्यावरच लक्ष ठेवून होती. तो कसा नाराज होतो ते तिला पहायचे होते.

तो बॉक्स घेऊन तो त्याच्या खोलीत गेला. तीही त्याच्या नकळत त्याच्या मागे गेली. ती हळूच दारामागून पहात होती . सोमेश खूप हसऱ्या चेहऱ्याने तो बॉक्स काळजीपूर्वक उघडत होता. त्याने हळूच बॉक्स उघडला, आणि आत पहिले. बॉक्स तर रिकामाच होता. त्याने अलगद त्यातला वास घेतला आणि तो मनोमन आनंदला आणि बॉक्सला मिठी मारून बसला. थोड्या वेळाने तो बॉक्स आणि त्याला मिळालेले बाकी सर्व

गिफ्ट्स उचलून देवघरात गेला. भक्ति हे सर्व आश्चऱ्याने आणि देहभान हरखून पाहत होती .  तो इवलासा जीव काय काय करतो हेच तिला कळत नव्हते तिच्या डोळयात  आसवे तरळली होती. ती त्याच्या मागे देवघरात गेली आणि लपून सर्व पाहत होती.

त्याने तो बॉक्स देवासमोर ठेवला आणि त्याचे सर्व  गिफ्टस सुद्धा ठेवले. तो हात जोडून देवासमोर उभा राहिला आणि म्हणाला "देवबाप्पा, हे सारे गिफ्ट्स तुला घे, पण माझ्या आईला लवकर बरे कर. बघ ना, बाळ झाल्यापासून तिला बरे वाटत नाही,  तिला मला जवळ घेण्याची खूप इच्छा आहे रे, पण ती बिचारी इतकी चांगली आहे की तिचा आजार मला होऊ नये म्हणून मला जवळ सुद्धा घेत नाही.  आणि बघ तिने आज मला किती छान गिफ्ट दिलाय ते.  एक बॉक्स भरून गोड गोड पापे दिलेत. इतकी गोड आई फक्त माझीच आहे. प्लीज देवबाप्पा तिला लवकर बरे  कर. मी तुला परत कधी कधी काही मागणार नाही. माझ्या आई पेक्षा भारी या जगात काहीच नाहीये. प्रॉमिस कर तिला बरी करशील म्हणून. प्रॉमिस ना "

हे ऐकून भक्ति आतल्या आत तुटून गेली आणि स्वत:ला थांबवू शकली नाही. पळत जाऊन तिने सोमेशला घट्ट जवळ घेतले आणि “बाळा, मला देवबाप्पाने कायमचे बरे केले” असे म्हणून जोरात रडू लागली.

# शरदाची.चाँदनी @जीमेल.कॉम

शरद इन्स्ट्रुमेंट इंजिनियर होता. पुण्यातील एका वाहन बनविणाऱ्या कंपनीत तो व्हाईस प्रेसिडेंट होता. वयाच्या अवघ्या चाळीसाव्या वर्षी तो व्ही पी बनला होता. अर्थातच तो अतिशय हुशार आणि कष्टाळू वृत्तीचा होता. लहानपणापासूनच एका उच्च मध्यमवर्गीय कुटुंबातून वाढलेला शरद केवळ हुशारच नाही तर इतर गुणांनीही समृद्ध होता.

पाच फूट नऊ इंच ऊंची, गोरा पान रंग, रुंद बांधा आणि भारदस्त दिसणारा. त्याच्या आवाजात देखील एक दमदारपणा होता. जेव्हा तो

चालायचा तेव्हा समोरच्या माणसाने रस्ता द्यावाच अशी रुबाबदार चाल होती त्याची. चालता चालता चष्म्याला मधेच हात लावायची त्याची एक लकब होती. त्याचे केवळ व्यक्तिमत्वच उमदे असे होते असे नाही तर तो त्याच्या काळातला एक यशस्वी फूटबॉल प्लेयर पण होता. शिवाय गाणे म्हणजे त्याचा छंदच आणि एकदम स्वच्छंदी असा स्वभाव, अशा या शरदवर कॉलेजमध्ये कोणी मुलगी भाळली नसेल तरच नवल. म्हणूनच की काय हा इन्स्ट्रुमेंट इंजिनियरिंग शिकत असूनही त्याच कॉलेजमध्ये होम सायन्स शिकणाऱ्या शलाका बरोबर त्याचे लग्न झाले होते.

शलाका एकदम नाजूक, सडपातळ बांधा, खांद्याइतकेच केस, मोजकेच बोलणारी, एकदम रिजर्व्ड नेचर, राहणीमान फारच शिस्तीचे आणि अभ्यासू अशी मुलगी होती. तिला पाहताच डोळयात बसावी अशी होती ती. तिचे सर्व काम शिस्तीत असायचे. घराची शिस्त, वातावरण आणि स्वत:चे दिसणे हे ती कधीच बिघडू देत नसे. दररोज योगासने, फिरणे आणि आहाराच्या बाबतीत काटेकोरपणा हा तिच्या रोजच्या जीवनाचा अविभाज्य घटक बनला होता. त्यामुळे वयाच्या अडोतीसाव्या वर्षीही

पंचवीस वर्षाच्या तरुणीला लाजवेल अशी सुरेख ती दिसायची. तिला पाहून तिला चौदा वर्षांचा मुलगा आहे हे कोणी मान्यच करत नसायचे. शार्दुल – तिचा मुलगा तिला रोज “आई तू संतूर साबणच्या जाहिरातीत जा” असे एकदा तरी म्हणत असे. एकूणच सर्व काही खूप छान होते.

शरदचे शलाकावर खूप प्रेम होते आणि तिचा शांत स्वभाव त्याला मनोमन खूप आवडायचा. रोज सकाळी ऑफिसला जायला तयार होऊन खाली आला की शार्दुलची नजर चुकवून तो एकदा तरी शलाकाला आपल्या मिठीत खेचत असे. वरवरून ती म्हणत असे “शरद, अरे शार्दुल आता मोठा झालाय, जरा सावर स्वत:ला”. तरी शरदच्या त्या हरकतीने ती मनोमन सुखावून जात असे. तिला शरदचे वरचे वर गोड खाणे पसंत नव्हते. त्यातच त्याची जाडी देखील वाढली होती. ती त्याला जाडीवरुन वरचे वर टोकत असे, पण शरद आपल्या वाढलेल्या जाडीकडे दुर्लक्ष करीत असे. तिने त्याला कित्येकदा त्याचे फूटबॉल चॅम्पियन असण्याची आठवण सुद्धा करून दिली होती. पण काही उपयोग नव्हता. कारण तो दिवसभराच्या कामाच्या व्यापानेच इतका दमून जायचा की घरी आले की फक्त थोडा टी व्ही पाहणे,

डिनर मग झोप, एवढेच त्याचे रुटीन बनले होते. शलाकाला मात्र ही गोष्ट अगदी राहून राहून टोचत होती. शरदचे आरोग्य चांगले रहावे यासाठी तिची सतत धडपड असे.

एकदा शरद नेहमी प्रमाणे ऑफिसमध्ये असताना त्याचा मेल बॉक्स ओपन होता. ऑफिशियल मेल्स तो चेक करत असताना मधेच एक नवीन मेल आयडीवरुन आलेली मेल त्याला दिसली. त्याने ती चेक न करताच बाकीच्या मेल चेक करत राहिला आणि त्यांची उत्तरे देत राहिला. त्या मेल बाबत तो विसरून गेला. दुसऱ्या दिवशीसुद्धा त्या मेल आयडी वरुन त्याला एक मेल आले होते. त्याने तेही दुर्लक्षित केले. तिसऱ्या दिवशीही इनबॉक्स मध्ये तोच नवा ईमेल आयडी शरदाची.चाँदनी@जीमेल.कॉम. आज मात्र शरद त्या मेल कडे दुर्लक्ष करणार नव्हता. त्याने ती मेल ओपन केली आणि तो वाचू लागला ...

***प्रिय शरद ,***

*कसा आहेस? मी तुला गेले तीन दिवस झाले मेल पाठवीत आहे आणि तू त्याचा काहीच रीप्लाय देत नाहीस.*

*चंद्रकला*

त्याने एक मिनिटभर विचार केला कोण आहे ही चंद्रकला ? मग त्याने आदल्या दिवशीची मेल ओपन केली त्यात लिहिले होते

*प्रिय शरद,*

*का रे? माझी मेल ओपन करूनही रीप्लाय नाही दिलास. तुला माझे मेल पाठवणे आवडत नाही का ?*

*चंद्रकला*

त्याने परत सर्वात पहिली मेल ओपन केली त्यात तिची पूर्ण ओळख दिली होती .

*प्रिय शरद,*

*ओळखलेस? मी चंद्रकला, यस तीच चंद्रकला घोष. आठवले ?? मला बांगला ब्युटि म्हणत असत कॉलेजमध्ये. परवा रस्त्यावरून तू क्रॉस झालास आणि एकदम सारे कॉलेज लाइफ आठवले. तुझ्या फेस बूक वरुन तुझा ईमेल आयडी घेतला आणि मेल पाठविले. तुला माझे मेल येणे अपेक्षित नसणार, खात्री आहे माझी. नव्हे, तू मला ओळखलेच नसणार ही पण खात्री आहे माझी पण रीप्लाय दे. वाट पाहतीये .*

*चंद्रकला देबोजीत चटर्जी*

आणि कामाच्या घोंगऱ्यात परत रीप्लाय देण्याचे विसरून गेला. दुसऱ्या दिवशी परत तीच मेल सकाळी साधारण दहा वाजायच्या सुमारास या मेल यायची वेळ असायची. आज मात्र शरदने परत मेल ओपन केले.

***अतिप्रिय शरद ,***

***राग येतो ना माझा? मी तुला मेल पाठविते, तुझा मौल्यवान वेळ खर्ची घालते, पण मी तरी काय करू रे? माझ्या डोळयासमोरून तुझी छबि जातच नाही. म्हणून तू रीप्लाय देत नाहीस तरीही तुला मेल पाठवावे वाटते. सतत मनात तुझेच विचार येतात. एकदा तरी रीप्लाय देशीलच ना? रागात का होईना, काहीतरी टाइप कर. तुझा रीप्लाय आला तरी तू माझ्याकडे आल्यासारखे आहे माझ्यासाठी. वाट पाहतीये.***

***चंद्रकला***

आज मात्र शरद त्याकडे दुर्लक्ष करू शकत नव्हता. जरा मायनाच तसा होता. त्याने रीप्लाय करायला घेतले.

*चंद्रकला मॅडम ,*

*मी तुम्हाला ओळखत नाही. तुम्ही कॉलेज मध्ये असाल तर मला आठवत पण नाही. मला माहीत नसलेल्या लोकांशी मी नाते ठेवत नाही. तुम्हाला माझ्याकडून काय अपेक्षित आहे याचा अंदाजही येत नाही आणि मला तो घेण्यात काही रस नाही .*

*शरद पेंडसे*

*व्ही पी ओपरेशन्स*

दुसऱ्या दिवशी नेहमीच्या वेळेला त्याला परत त्या आयडी वरुन मेल आले. त्याला अनपेक्षित होते, पण तरीही त्याने ते ओपन केले.

*माझ्या प्रिय शरद,*

*मी आधीच संगितले होते , की तू मला ओळखणार नाहीस. पण मी तुला ओळखते राजा. प्लीज मला असे धुडकावू नकोस. अरे मी, मी चंद्रकला घोष, आता लग्नानंतर माझे नाव चंद्रकला देबोजीत चटर्जी झाले आहे. माझा नवरा श्री देबोजीत चटर्जी खूप चांगली व्यक्ति आहे. पण मला तू फार आवडतोस ..... अजूनही ...........*

*चंद्रकला*

ते वाचून शरद थोडा डोक्याने तापला, “काय बाई आहे? नवरा चांगला आहे म्हणतीये आणि एका परपुरुषाला आवडतो म्हणून सांगते, जरा फॉरवर्डच दिसते.” त्याने लगेच अम्याला फोन लावला आणि विचारले “अम्या, यार आपल्या कॉलेज मध्ये ही चंद्रकला घोष कोण होती रे?, स्वत:ला बंगला ब्युटि सांगते”

त्याने उत्तर दिले “मलाही नाही बाबा आठवत, का रे शरया काय झाले ? काही लोचा आहे का?”

“काही नाही “ म्हणून शरदने फोन कट केला.  त्याने की बोर्ड दाणादाण आपटत तिला रीप्लाय टाइप केला

*मॅडम*

*तुम्ही मला का डिस्टर्ब करीत आहात?  आय एएम लीस्ट इंटेरेस्टेड इन यू. प्लीज डोन्ट मेल मी अगेन. यू बेटर अंडरस्टॅंड, टेक धीस मेल लाइक वार्निंग.*

*शरद पेंडसे*

*व्ही पी ओपरेश्न्स.*

त्याला आता खात्री होती की परत नक्की मेल येणार नाही. बरे झाले हुसकवले. घरी गेल्यावर तो शलाका जवळ बराच वेळ शांत बसून राहिला. ती बोलू लागली “काय झाले शरद? काही प्रॉब्लेम आहे का रे? थोडा अस्वस्थ दिसतोयस? का काही हेल्थ प्रॉब्लेम आहे.” शरद शांत.

“किती वेळा संगीतलय, थोडा व्यायाम करीत जा. ते पोट आणि जाडी कमी कर. पण तू म्हणून ऐकणार नाहीस” शलाका .

शरद तिच्या अंगावर खेकसला “हे बघ, जरा डोक्याला शांति हवी म्हणून मी इथे बसलोय. तुझी फालतू बडबड नको करूस”

शलाकाला खूप वाईट वाटले. या पूर्वी तो असा कधीही वागला नाही. काय झाले असावे बरे............?

दुसऱ्या दिवशी शरदने इनबॉक्स ओपन केला. ऑफिशियल मेल ची दखल घेतली. आणि आपल्या कामात मग्न झाला. झाले, परत दहा वाजायच्या आसपास न्यूमेलची बीप वाजली आणि तीच चंद्रकला आली. <शरदाची.चाँदनी@जीमेल.कॉम>

त्याने लक्ष देऊन मेल आयडी वाचला. आणि त्याचा रागाचा पारा अजून वर गेला. त्याने रागत मेल ओपन केले.

*माझ्या प्रिय शरदा,*

*रागावू नकोस असा. मला तुझ्याकडून काहीही नको आहे. तुला भेटायला ही नको आहे. तुला माहिती आहे, कॉलेजमध्ये असताना तू आणि मी एकाच एक्झॅम हॉलमध्ये होतो. असू देत. तू तेव्हाही खूप आवडायचास मला. आणि आजही तेवढाच, एव्हाना त्यापेक्षाही जास्त आवडतोस. कॉलेजमध्ये एकही मुलगी अशी नव्हती जिला तू आवडत नसशील. तेव्हा सांगायला मिळाले नाही, नव्हे हिम्मत्च झाली नाही. म्हणून आत्ता सांगतीये. काय झाले माझे लग्न झाले असले तर? मी माझ्या देबोजीतशी प्रतारणा अजिबात करत नाहीये. पण तू मला आवडतोस. ... खूप .*

*चंद्रा*

शरद शांत डोक्याने ते वाचत होता. “बिचारीला मी फक्त आवडतो इतकेच सांगायचे म्हणून मेल करते. तिची माझ्याकडून काहीही अपेक्षाही नाहीये. निरपेक्षता, स्व्छता. शिवाय पतीसोबत प्रामाणिक आहे ती. कशाला दुखवू तिला? उगाचच दुखावले काल देखील. माफी मागतो आणि विषय संपवतो. आणि सांगतो की परत काही मेल करू नकोस. बहुधा तिला शलाकाविषयी माहिती नसावे. आणि नाही तेच बरे आहे. नाहीतर तिला काहीतरी बोलायची.

त्याने टाइप केले

***चंद्रा***

***मला माफ कर. मी तुझ्या भावना दुखवल्या. तुझे मन स्वच्छ आहे. छान वाटले मला. आता तुझे समाधान झाले ना? कृपया मेल करू नकोस आता.***

***शरद***

त्या रात्री शरद थोडा उत्साही मूडमध्येच होता. मी शलाका व्यतिरिक्त कोणाला तरी आवडतो. शिवाय उद्या परत त्या मेलचा त्रास नाही अशी द्विधा अवस्था त्याची झाली होती. त्याने शलाकाशी त्या दिवशी खूप छान गप्पा मारल्या. तिलाही छान वाटले.

पुढील दिवशी मेल बॉक्स मध्ये ते मेल नव्हते. त्याला हायसे वाटले. 'चला सुटलो' असा श्वास त्याने सोडला. दहा वाजता पण मेल आले नाही. त्याला किंचित बेचैन वाटले. पण 'सुटल्या'चे समाधान जास्त होते. अकरा वाजता त्या आयडी वरून त्याला परत मेल आले. त्याने थोडाही उशीर न करता ते ओपन केले.

***प्रिय शरद***

***किती आभार मानू मी तुझे !!! तू समजून घेतलंस. ते दिवसच खूप छान होते रे. तू फार फार रुबाबदार दिसायचास. तसा अजूनही दिसतोस, पण थोडासा मोटा झाला आहेस. आता मी तुला रोज पाहते, घराच्या***

***खिडकीतून. तू दिसतोस आणि मी आसमंत विसरूनच जाते. पण एक गोष्ट सांगू का तुझ्या चेहऱ्यातला गोडवा आहे तसा आहे. तुझे बेढब पोट थोडे कमी केलेस की अजूनही कॉलेजचा विद्यार्थीच वाटशील. काय रे तुला शलाका कधी असे सांगत नाही का? तशी ती थोडी शिष्ठच होती. पण ती तुझ्यापेक्षा देखणी नक्कीच नाही. तू रीप्लाय देशीलच.***

***चंदा***

शरदला आता स्वत:चा राग येत होता. तो स्वत:शीच विचार करीत होता. हिचे परत मेल येणे मला अनपेक्षित होते. मग मी का तिची मेल इतक्या घाईत ओपन केली? का मला हिचा राग येत नाही? कदाचित मलाही ती आवडायला... नाही नाही. मला शलाकाव्यतरिक्त दुसरे कोणी आवडूच शकत नाही. पण मी खरच असा बेढब झालोय का? मी आरशातच पाहतो. शरद आपल्याला आरशात निरखतो, आणि त्याला अचानक आपली जाडी आणि पोट वाढल्याची जाणीव व्हायला लागते.

“कमी करायलाच हवे हे पोट थोडे. मग इतके दिवस शलाका सांगत होती तर का नाही ऐकले मी? .. चंद्राचेच का ऐकतोय ...? मला ती आवडायला तर नाही ना ...?.नाही नाही, मला माझ्या शलाका व्यतिरिक्त कोणीच आवडत नाही”

सायंकाळी घरी गेल्यावर टी व्ही पाहायचा सोडून शरद फक्त शलाकाच्या मागे मागे फिरू लागला. कुठे तिचे केस मागे घे, कुठे तिला लाडिक चिमटा काढ, कुठे तिचा रस्ता अडव असे त्याचे चालले होते. शेवटी तिने हसून विचारले “शरदराव, आज सवारी भलतीच खूशीत दिसते, आणि माझेच नशीब आज सोन्याचा घास खाते आहे, की आपण आमच्या मागे मागे फिरत आहात. बोला आपणास काही हवे आहे का?”

यावर शरद हसून म्हणाला,“राणी सरकार, आम्ही तुमचे गुलाम आहोत, आणि क्षणा क्षणाला तुमच्या मागे राहण्याची सुंदर शिक्षा आम्ही भोगतोय. मैं कही कवि न बन जाऊं, तेरे प्यार मे ए शलाका.”

शलाका म्हणाली “बहुत खूब | आता जेवायचे का आपण?”

शलाकाच्या बोलण्याला मान्यता दाखवत शरद टेबल वर येऊन बसला. तिने पोळी आणि सोबत श्रीखंड वाढले. तेवढ्यात तो म्हणाला,“नको श्रीखंड मला, मी वजन कमी करायचं ठरवलय.”

“काय !!” शलाका आनंदाने म्हणाली, “बरे झाले तुझं तूच ठरवलंस, मी तर तुला आताशा असे सांगणे सोडूनच दिले होते”.

दुसऱ्याच दिवशी शरदने जिम जॉइन केली. ऑफिस मध्ये गेल्या गेल्या आधी त्याने इनबॉक्स ओपन केला. तर त्यात नुकतीच चंद्रकलाची मेल आली होती. तिने लिहिले होते की तिला तातडीने गावाला जावे लागत आहे कलकत्त्याला. त्यामुळे पंधरा दिवसांनी भेटू.

शरदला विनाकारण बेचैन वाटले. सर्व काही शांत सुन्न वाटू लागले. तो परत विचार करू लागला. काय बरे घडले असेल की चंद्रकला तातडीने कलकत्त्याला गेली? पण मी तिचा का विचार करतोय एवढा? मी शलाकाला फसवत तर नाही ना? मग मला स्थीर का वाटत नाहीये? माझा माझ्या मनावर का ताबा नाहीये?

वेळेसोबत तो कामात गढून गेला. शिवाय चंद्रकलाचे मेलही येणे बंद होते. तो रोज जिमला जात होता. फिरत होता. आणि त्यामुळे त्याचे वजन आणि वाढलेला घेर कमी झाले होते.

पंधरा ते वीस दिवसांमध्येच त्याला एक वेगळा उत्साह जाणवू लागला होता. शलाका ही त्याला म्हणाली “वाव, शरद यू आर लूकिंग कूल अगेन लाइक यू डिड इन कॉलेज स्वीटहार्ट.”

तिचे हे वाक्य ऐकताच त्याला चंद्राची आठवण आली. त्याने ऑफिस मध्ये जाताच इनबॉक्स ओपन केला. आज एकवीस दिवस झाले तरी चंदा परत कशी नाही आली? किंवा आली असावी पण तिने मला मेल पाठविले नसावे? का तिच्या नवऱ्याला माहिती झाले या बद्दल? पण मी का तिचा विचार करतोय एवढा? मला ती आवडायला तर...? नाही नाही, मला शलाका व्यतीरिक्त अन्य कोणीही नाही आवडत. मग चंद्रकलाने सांगताच मी का वजन कमी केले माझे? मी शलाकाचे का नाही ऐकले एवढे दिवस? मी एवढा का विचार करतोय? फक्त शलाका शलाका शलाकाच आवडते मला.

तेवढ्यात चंद्रकलाची मेल इनबॉक्समध्ये आली. त्याने क्षणभरही वेळ न दवडता त्याने ते ओपन केले. त्याला वेगळाच आनंद झाला होता. तिने लिहिले होते,

*प्रिय शरद,*

*माझा माझ्या डोळ्यांवर विश्वासच बसत नव्हता. तो तूच आहेस, जो मी जाण्याआधी पाहिला होता? काय हॅंडसम दिसतोयस तू! अरे चक्क चक्क तू वजन कमी केलेस तुझे. आय स्वेयर, यू लूक हॅंडसम, लाइक इन कॉलेज डेज. आय वॉज जस्ट डंब वुइथ डीसपेअर टु सी यू. आता खरे बोलल्याशिवाय राहवत नाही बघ. तू अजून जास्त आकर्षक वाटायला लागलायस, अगदी कॉलेजमध्ये होतास तसाच. किंबहुना त्या पेक्षाही जास्त. आठवतंय का तू 'तेरी प्यारी प्यारी सूरत को ...” गायचास. तेव्हा तर मला राजेंद्रकुमारच्या जागी तू आणि वैजयंतीमाला च्या जागी मीच दिसायचे. हे दिवा स्वप्न*

*असायचे. आणि त्यातच तुला शलाका आवडायला लागली. ती आणि मी खूप चांगल्या मैत्रिणी होतो. तू तिला पटवल्यापासून मी तिच्याशी बोलणे कमी केले होते. मला तिच्याबद्दल ईर्ष्या वाटायची. कॉलेजची मुले शलाका मागे, तू तिच्यामागे आणि मी तुझ्यामागे. शरद, खरे सांगते रे, मी तुझ्यावर खूप प्रेम करायचे, आजही करते. मी माझ्या पतीशी प्रतारणा नाही करत, पण माझे तुझ्यावर प्रेम आहे. मला तुझ्याकडून प्रेमही नकोय कारण ते तेव्हाच शलाकाचे होते आणि आजही.*

*बट  आय लव यू शरद अँड आय विल लव यू फोरेवर. फक्त कबूल करायचे होते इतकेच.”*

*एक वेडी,*

*शरदाची चांदणी*

शरदच्या डोक्यात निखारे पेटले होते. त्याने विचार केला, हिला आपण बोलायला चान्स दिला तर काहीही बोलायला लागली. हिला काहीच कसे वाटत नाही? त्याने रागात रीप्लाय टाइप केला.

*चंद्रकला,*

*उगाच तुझे ऐकून मी जिम जॉइन केली. मला वाटले नव्हते की तू तुझी हद्द सोडशील. एवढे दिवस फक्त मी आवडतोय म्हणायची आणि आज ,.... आज प्रेम आहे म्हणतेस. आणि वर तोंड करून म्हणतेस की पतीशी प्रतारणा करीत नाही म्हणून. अगं, आपल्या नवऱ्याव्यतिरिक्त कोणत्याही परपुरुषावर प्रेम करणे म्हणजे त्याच्याशी प्रतारणच ना!! कसली बाई आहेस तू, शी....! मला राग येतोय तुझा. हेच जर शलाकाला कळाले तर ती काय विचार करेल? बास खूप झाले. इथून पुढे तू मला मेल पाठवायची नाही म्हणजे नाही ..बंद सारे काही.*

*शरद पेंडसे .*

त्याला दुसऱ्या दिवशी रीप्लाय आला होता.

*माझा प्रिय सखा शरद,*

*तू कितीही रागवलास ना तरीही हे सत्य आहे की माझे तुझ्यावर प्रेम आहे. शरद, तू तुझ्या आईवर प्रेम केले असशील ना! तुझ्या बहीणीवर केले असशीलच ना!! मग तू शलाकशी प्रतारणा केलीस का? तू तुझा जिगरी मित्र अमोलवर सुद्धा जिवापाड प्रेम केलेस ना? मग शलाकाशी प्रतारणा केलीस का?*

*मग तसेच माझे ही आहे. मी माझ्या आईवर प्रेम केले, भावा बहिणीन्वर प्रेम केले तसेच तुझ्यावरही केले. मग त्यात देबोजीतबरोबर प्रतारणा कसली? शरद माझे तुझ्यावर प्रेम आहे. पण मी तुझ्या प्रेमात पडली नाहीये.*

*प्रेम म्हणजे एका निखळ प्रवाहा सारखे असते. वासनेच्या भोवऱ्यात न अडकता, अपेक्षांच्या जल्पर्णीत न गुंतता जो हळुवार या प्रवाहात पोहत राहतो, तोच जगज्जेता होतो. आणि मी त्या निखळ प्रवाहसारखीच आहे. न मला तुझ्या स्पर्शाची आस, न तुला भेटण्याची, न तुझ्याशी बोलण्याची, न तुला मिळवण्याची. हे निरपेक्ष प्रेम आहे. तू माझ्याशी बोल अथवा न बोल, तू मला कधी भेट अथवा न भेट, तुला माझे पटो वा न पटो, तू मला ओळखो, वा ना ओळखो, मी तुझ्यावर प्रेम करीत राहणार आहे, शेवटच्या श्वासापर्यन्त.... माझ्या.*

*मी इथून पुढे तुला मेल पाठवणार नाही. तू समोरून गेलास तरी तुला ओळख दाखवणार नाही. घाबरू नकोस शलाकाला तर मुळीच भेटणार नाही. तू मला ओळखणार नाहीस यात तर तीळमात्र शंका नाही. पण तुला "माझे तुझ्यावर प्रेम असणाऱ्या भावनेचा त्रास झाला" मी त्यामुळे शिक्षेस पात्र आहे. शिक्षा हीच की मी परत तुला कधी काही मेल पाठवणार नाही, आणि असेही मी हे शहर सोडून जात आहे, कायमची. सुखी रहा.*

## *शरदाची चांदणी .*

शरद हे वाचून सुन्न झाला होता. त्याला त्याच्या तोकड्या विचारसरणीची कीव येऊ लागली होती. आणि तो चंद्रकला समोर स्वतःला खूप ठेंगणा भासू लागला होता. पण त्याचे मन चिरतरुण असल्यासारखे त्याला भासत होते. कोणी इतक्या सुंदर प्रकारे आपल्यावर प्रेम करू शकते, प्रेमाचा अर्थ इतक्या सुंदर प्रकारे सांगू शकते. आपण खरेच काहीतरी वेगळे आहोत. आपल्या या वेगळेपणापासून शलाकाला तरी वंचित राहू द्यायचे नाही.

तो घरी गेला शलाकाला जवळ घेऊन तिच्या कानात हळूच बोलला. “शलाका, आय लव यू.”

ती बोलली “आज काही खास आहे का?”

तो म्हणाला “हो आहे ना आज पौर्णिमा आहे. काय गं? तुझा मेल आयडी बंद वगैरे आहे का काय? बरेच दिवसात मेल नाही पाठवलेस मला??”

ती त्याच्या पासून दूर होऊन लॅप टॉप घेत म्हणाली “अरे हो, बंद पडला होता, एक महिन्यापूर्वीच  नवीन आयडी घेतलाय आणि तिने त्याच्या नकळत तिचा मेल आयडी लॅपटॉप वर टाइप केला आणि हसू लागली.

तिचा मेल आयडी होता शरदाची.चाँदनी@जीमेल.कॉम आणि पासवर्ड होता “मीचतुझीप्रिया”

# वावटळ

महर्षीनगर झोपडपट्टी. त्यात एका खोलीत पूजा, तिचा मोठा भाऊ महेश. काकी (आईलाच काकी म्हणत असत) आणि काका (वडील) असे कुटुंब एक दहा बाय दहा च्या खोलीत राहत. काका रेल्वे हमाल, महेश ट्रक ड्रायवर युपी, दिल्ली, नोयडा लाईनला. काकी धुणे भांडी करीत असे आणि पूजा तिला मदत करीत असे. पूजा अशातच 12वी कॉमर्स पर्यन्त शिकली.

एकदा रेल्वे लाईनवर काकांचा ॲक्सिडेंट झाला आणि त्यांचा दुर्दैवी मृत्यू झाला. काकी पूर्ण खचून गेली. “पोरगं कवडीबी देत नाही घरात. आता ही

तरुण पोर म्या कशी जगवणार रे देवा?” काकीला खूप टेंशन आले होते. “चोवीस वर्षांची झाली पुरगी, क्वान  लगीन कराल हिच्या संगत?” तिला एकटीला कामाला पाठवणेही काकीला जिवावर येत असे. पण खाणार काय पोटाला? त्यातून समोरच्या झोपडीतल्या नान्याची ‘लई वाईट नजर’ होती पोरीवर. अशातच शेजारल्या खोलीतला रवी म्हणाला “काकी, मी करील लगीन हिच्या संगत, तुम्हाला कसला यतराज नाही ना? फुलासारखी ठेवीन तिला. तिची समदी काळजी घ्यिन. आपले पण कोण नाय जगात. लगीन झाल्यावर मला माय पण मिळन आणि बायकू पण”

काकी फार खुश झाली.

एकदा तिच्या पायाला  गॅंगरीन झालं आणि ती उलटे दिवस मोजू लागली. तिने पूजाचे लग्न पहायची शेवटची इच्छा व्यक्त केली. दुपारीच पूजा शेजारच्या बागेतून फुले घेऊन आली. त्याचे तीन हार केले. दुसऱ्या दिवशी  सकाळी एक हार देवाला घातला. मग पंधरा चपात्या आणि भाजी केली. पेटीत एक नवी साडी होती ती नेसली. आणि जाऊन रवीला सर्व सांगून बोलाऊन आणले. रवीने त्याचे दोन मित्र पण बोलावले. त्याच

दिवशी म्हणजे 23 जुनला पूजा आणि रवीचे लग्न काकी आणि दोन मित्रांसमोर पार पडले. लग्न झाल्यावर पूजाने सर्वांना तिने केलेली चपाती भाजी जेवायला वाढले. गोड म्हणून प्रसादातला खडीसाखरेचा खडा प्रत्येकाच्या पानात वाढला.

काकीच्या पाया पडल्यावर, काकी शांत हसली, रवीने तिला वचन दिले, “इकडचे जग इकडे झाले तरी मी पूजाला कधीच अंतर देणार नाही. तिला नेहमी सुखात ठेवीन. काळजी करू नका”

दोनच दिवसांत काकी गेली. आता पूजा रवी सोबत राहू लागली. गळयात काली पोत आणि त्याला पितळी डोरली. पण ती खुश होती. रवीने ओळखले होते की पूजा गरीबीत वाढली पण ती फार स्वाभिमानी होती. कधीही कोणासमोर हार पसरले नाहीत. लवकरच तिने एक नोकरी शोधली. क्लार्क, पगार –रुपये 1700 सुरूवातीला. मग परफॉर्मन्स पाहून पगार वाढवण्यात येईल म्हणून सूचना मिळाली. पूजा कामावर जाऊ लागली. रवी पण छोटी मोठी नोकरी करत होता. जसे जसे दिवस जातील

तसा तसा दोघांचा पगार वाढत गेला आता दोघांना मिळून महिन्याचे 9000 रुपये मिळत होते.

मग त्यांनी जवळच एक भाडोत्री घर घेतले. घर छान होते, नाव “निवारा”. दोनच खोल्या, संडास बाथरूम आणि अंगण. भाडे रुपये 3000. दोघे तिथे राहायला गेले. दारात तिने एक छान तुळशी वृंदावन मांडले. ती रोज तुळशीला पाणी, दिवाबत्ती करीत असे. आपल्या हाताने तिने ते घर खूप छान सजवले होते. तिने आणि रवीने भविष्यात तेच घर विकत घेण्याचे मनाशी ठरवले होते. पण हाती पैसा नसल्याने काही बोलणे केले नव्हते इतकेच. तिची घर सजवायची आवड रवी छान जपत असे.

रवीचे मात्र स्वप्न होते की गावी शेती होती सहा एकर तिथे शेती करावे आणि रहावे. तो पूजाला म्हणत असे, मी शेती करायला लागल्यावर तू नोकरी करायची नाही. आपण गावातल्या घरात राहायचे, तू माझ्यासाठी शेतात जेवण बनवून आणायचेस. आपली मुले ही शेतातल्या झाडाच्याच हिंदोळ्यावर झूलतील. तिने कधी तसे जीवन न अनुभवल्यामुळे ती काहीच बोलत नसे. पण मनात तिने पक्के ठरवले होते की रवीचे हे स्वप्न साकार

करायचे. यासाठी  रवी फक्त हातात थोड्या खेळत्या पैशांची वाट पाहत होता.  दोघे मिळून पैसे साठवत होते. दोघांचे एकमेकांवर अफाट प्रेम होते.

आज परत 23 जून. त्यांच्या लग्नाचा चौथा वाढदिवस. पूजा खूप खुश होती. फिक्कट लिंबू  रंगाचा टॉप आणि पांढऱ्या रंगाची चुणीची सलवार, हातात एक एक लिंबू कलरचे गोठ, कानात एक ग्राम सोन्याचे बुंदके, कपाळावर छोटीशी टिकली, खांद्याएवढे कुरुळे केस, चांगली पाच फुट सहा इंच एवढी ऊंची आणि सावळा वर्ण.  एकदम कणखर वागणे आणि सरल स्वाभिमानी बोलणे.  ती आज गोड दिसत होती.  बॉस श्री चैतन्य जोशी ने तिला विश केल “ पूजा गूड मॉर्निंग , लूकिंग गोजिअस टूडे.” तिने ही स्माईल करून थॅंक्सचा रीप्लाय दिला.,  दहाच्या सुमारास एक बंद पाकीट  बॉसची सेक्रेटरी मिस रीना ने पूजाला आणून दिले.  तिने ते उघडले.  त्यात खालील मजकूर होता.

मिस पूजा ,

तुम्हाला कसे सांगू कळत नाही. अचानक तुमचा नवरा विकला गेलाय. आताच मिस्टर रविंचा फोन आला होता. त्यांनीच सांगितले. ग्राहकाने चांगले १८लाख रुपये मोजलेत. एवढी रक्कम आता कोण सोडतंय म्हणा!! तुम्ही काही करार तर केला नव्हता. आणि केला असता तरी त्याचा या क्षणी उपयोग झाला नसता. कारण व्यवहार झालाय. एवढ्या मोठ्या शहरात तुम्ही कुठे जाणार?

मी एक ऑफर देतो. तुम्ही आजची रात्र माझ्याकडे राहू शकता. तुमची उद्याची सुट्टी देखील मी मंजूर करेन. पण उद्याही जर रहायचे असेल तर तुम्हाला तुमचा आणि माझा पण स्वयंपाक करावा लागेल कारण माझी बायको घरी नाहीये. ती गावी गेली आहे. काळजी करू नका. मी ही गोष्ट कोणालाही सांगणार नाही. मी रीनालाही तसे बजावून सांगीतले आहे. त्यामुळे ती पण कोणालाही काही बोलणार नाही. मी माझ्या केबिनमध्ये बोलवूनच तुम्हाला हे सांगणार होतो. पण तुम्ही खूप स्वाभिमानी आहात,

आणि भिंतींनाही कान असतात. त्यामुळे मी उघड उघड बोललो नाही इतकेच.

तुम्ही हवे तर तुमच्या मिस्टरांशी म्हणजे रवीशी या बद्दल बोलून घ्या. मी त्यांनाही तेच सुचवले आहे. त्यांची काहीच हरकत नाही. उलटपक्षी त्यांना बरे वाटले आणि ते म्हणाले की आता तुम्हीही सतत याच विचारात असणार की “आता कोठे जायचे?” सकारात्मक विचार कराल अशी माझी अपेक्षा आहे. तसे मला कळवा मात्र नक्की. म्हणजे मी नोकराला खोली स्वच्छ करून सजवायला सांगतो. की जेणे करून तुम्हाला प्रसन्न वाटेल.

कळावे तुमचा हितचिंतक ,

चैतन्य जोशी.

पूजा ते वाचून गोंधळली. तिच्यावर आभाळच कोसळले होते. तिच्या पायाखालची जमीनच सरकली होती. तिला काही सुचतच नव्हते. असे कसे झाले? रवीने असे अचानक का केले? का दगा दिला त्याने मला? आणि मला न सांगता बॉस ला का संगितले? त्या म्हाताऱ्याची हिम्मतच कशी झाली मला असे विचारण्याची? थेरडा! माझ्याएवढी मोठी मुलगी असेल त्याला, आणि या वयात नसते धंदे सुचताहेत? वरून तर किती चांगुलपणाचा आव आणतो आणि आत मात्र नासक्या मनाचा!! पण आता काय? रवीने का असे केले? का रवी असा का वागलास माझ्याशी? सांग ना??

टेबलवर बसल्या तिच्या डोळयातून आसवे गळत होती. ती कोणालाही काहीही बोलली नाही. पर्स घेऊन तडक उठली आणि ऑफिस बाहेर पडली. तिच्या मनात अनेक शंकांनी थैमान घातले होते. ती सरळ चालत सुटली. रवी आणि दगा तिला फक्त एवढेच दोन शब्द कानी घोंघावत होते. ती चालत चालत समुद्रकिनाऱ्यावर आली. तिने पर्स मधून मोबाइल काढला. सरळ रवीला फोन लावला. गाणे वाजत होते “हम तुम्हें चाहते है ऐसे, मरने

वाला कोई, जिंदगी चाहता हो जैसे"... तिला खूप राग आला त्या गाण्याचाही.

त्याने फोन उचलला.

ती "हॅलो रवी, जे बॉसकडून जे ऐकले ते खरे आहे?"

तो : अग हो, हे खरे तर तूलाच सांगायला हवे होते मी डायरेक्ट. पण तुझा मोबाइल लागलाच नाही. मला जरा तातडीचे वाटले म्हणूनच सांगितले. त्यांनी सांगितले ना तुला सगळे व्यवस्थित? मग काही विचार केलायस? तुझे काही म्हणणे असेल तर सांग.

ऐकता ऐकता ती रडू लागली. डोळे गच्च मिटून ती आसवे गाळीत जीव कानात गोळा करून ऐकत होती. तिला मेल्याहून मेल्यासारखे वाटत होते. तिच्या कानात काही आणि मनात काही असे काहूर तिच्या मेंदूत उठले होते. तिला सर्व काही शून्य जाणवत होते. त्याने परत तिला जागे केल्यासारखे करून बोलला

तो : अग पूजा मी तुझ्याशी बोलतोय. ऐकत आहेस ना?

ती : (रडवेल्या आवाजात) हो रे संगितले त्यांनी मला. पण नुसतेच नाही संगितले. तुला तर माहीत आहे या जगात गरिबीची किट्टी चेष्टा होते ते. आणि त्यातून जर ती गरीब व्यक्ति "नोकरी करणारी स्त्री असेल तर मग फारच. तुला माहिती आहे ना त्यांनी मला काय ऑफर दिली आहे ते? ते सांगत होते तुझ्याशी त्याबद्दल बोलल्याचे. तू शांतपणे ऐकून घेतल्याचेच मला नवल आणि वाईट पण वाटले.

तो : त्यांनी सांगीतले आहे मला. मला ठाऊक आहे हे तुला आवडणार नाही. पण काय हरकत आहे तुला ती ऑफर स्वीकारायला? हे बघ पूजा, इथे आपले न कोणी नातेवाईक, न कोणी आप्तेष्ट, न मित्र मैत्रिणी. मग अशात जाणार कुठे? मग मी तर म्हणतो स्वीकार त्यांची ऑफर. ते तर सुट्टी पण मंजूर करणार आहेत तुझी.

ती : तुला काहीच कसं रे वाटत नाही असे बोलताना? कुठे गेली ती तुझी वचने, तुझे वादे, तुझा स्वाभिमान, तुझी निष्ठा? का आता ते ही सारे विकलंयस?

तो : काहीतरीच काय यार पूजा? रीलॅक्स. इतकी भांबावून जाऊ नकोस. मुंबईसारख्या शहरात सर्व बाजूने विचार करावा लागतो. आणि पैशासमोर कुणाचे काय चालणार गं? तू उभे करू शकले असतीस का अठरा लाख रुपये? मी पण नसतोच ग एकाचवेळी उभी करू शकलो एवढी रक्कम. एक नशीब समज की आपल्याला काही मूल बाल नाही ते. नाहीतर काय केले असतेस सांग बरं? त्यांना घेऊन फुटपाथवर बसायचा विचार केला असतास? अभिमानाच्या गोष्टी सांगते मला.

ती : मग कालच फार प्रेम उतू चालल्यासारखे म्हणत होतास ना, आता आपण दोनाचे तीन व्हायचा विचार करायला हवा म्हणून. मग आता ? आता काय रे झाले? बोल न बोल आता गप्प का असा?

तो : हे बघ कालचे काल झाले. आत्ताचे बोल. उगाच डोके फिरवू नकोस. मी इथे आधीच तर समानाची बांधाबांध करतोय एकटाच. तुला ये सुद्धा म्हणालो नाही. आणि तुझी मात्र चाललीये बडबड. तुझ्या पण कपड्याची बॅग भरलीये. आता बोलणे बंद कर आणि लवकर ये जमले तर. आणि हो तुझ्या बॉसला कळव त्यांची ऑफर स्वीकारल्याचे. तो गाडी घेऊन येतोय

न्यायला. कसे आहे, उद्या त्यांची बायको आली म्हाणजे कुणाचे काहीच चालणार नाही, त्यापेक्षा ही संधी आता सोडू नकोस .

फोन कट .

ती सुन्न. एकदम सुन्न. मोबाइल हातून पडला ते ही कळत नाही. समुद्राची लाट अंगावर येऊन संपूर्ण अंग भिजवून गेली ते ही तिला कळले नाही. तिच्या मनात आले की इथेच आत्महत्या करावी. त्या विचाराने ती पुढे पुढे सरसावत होती.

तितक्यात एक लहान मुलगी रडल्याचा आवाज येतो, भुकेने व्याकूळ ती लहान मुलगी रडत होती. पूजाला बालपण आठवले. ती त्या लहान मुलीकडे पळत आली. पर्स मधील डबा काढला आणि तिला भरवायला चालू केले. ती लहान मुलगीही अधाशासारखी खात होती.

डब्बा तिलाच देऊन पूजा तेथून निघाली. तिला आजूबाजूला शून्य जाणवत होते आणि मनाने तर पार कोलमडून गेली होती बिचारी. सारखा एकच प्रश्न डोक्यात, ”रवी, मला असा दगा का दिलास? आणि दगाच

द्यायचा होता तर स्वप्ने का दाखविलीस? का दिलेस माझ्या लंगड्या आईला वचन? परत तिने विचार केला "अठरा लाख रुपये कोण सोडतोय? आणि रवी तरी का सोडेल? मी त्याला तेवढी रक्कम आयष्यात देऊ शकले नसते. पैशासाठी माणूस कोणतीही पातळी गाठतो. रवी पण त्यांच्यापैकीच एक. प्रेम,विश्वास नावाची काही गोष्टच नाही या जगी. सगळे खोटे, सगळी माया. तिच्या मनात फार मोठे वादळ थैमान घालत होते. चक्री वादळ. इथे मरताही नाही आले.

चालत चालत आली स्टेशन वर जाऊन रेल्वे ट्रॅक वर उभी राहिली. डोळे बंद केले. आणि डोळयायासमोर सरसर जुनी फिल्म आली. वडील रुळावर मृत्यू मुखी पडलेले, त्यांचा हातापायच्या झालेल्या चिथड्या, राडा आणि तो कर्कष्य आवाज. तिने दचकून डोळे उघडले आणि क्षणात बाजूला झाली. इथलाही प्रयत्न फसला. बहुधा माझ्यात आत्महत्या करायचे साहस नाही. चला सटका इथून. म्हणून निघाली. विचार चक्रात गुंतत गुंतत तिला वेळेचेही भान राहिले नाही. दुपारचे चार वाजले होते. तिची पाऊले हळू

हळू घराकडे निघाली. रवीशिवाय राहणे हे तिच्या पचनी न पडण्यासारखे होते.

विचार करत करत पाच वाजता ती घरी आली. एव्हाना वाळून पण गेली होती ती. रवी घराला कुलूप लावून बॅग भरून बाहेर तयार होऊन पूजाची वाट पाहत होता. ती आलीच. लंगड्या मनाने, मेलेल्या मनाने अगदी प्रेतासारखी निर्जीव.

तो : अग पूजा किती वेळ? कुठे होतीस एवढा वेळ? चल घे हे सामान , तुझे साहेब येतीलच एवढ्यात गाडी घेऊन.

मिस्टर चैतन्य जोशी, तेवढ्यात आपली गाडी घेऊन येतात. रवी पूजा कडेच बोलायला वळलेला, परत गाडीकडे वळतो. तोच त्या बॅगस गाडीत ठेवतो आणि पूजाचा हात धरून तिला साहेबांच्या गाडीत नेऊन बसवतो. साहेब खाली उतरतात. आणि रवीकडे जातात. पूजा आरशातून पाहत असते. त्या दोघंच काहीतरी संभाषण चालू आहे हे ती पाहते. साहेब रवीच्या हातावर १००० च्या नोटांचे ३ बंडल देतात, ते ती पाहते. मग तर

ती फार रडू लागते. रवीने याही कामाचे पैसे घेतले का साहेबांकडून? इतका नीच असू शकतो हा? माझा तर विश्वासच बसत नाही. रवी एका दिवसात इतका कसा बदलला. रवीने आपल्याला धोका दिला ही वावटळ तिच्या मनात सदा भिरभिरत असते.

गाडीत साहेब बसले, आणि गाडी निघून गेली. रवीने इतके वाईट वागावे, की साधा निरोप सुद्धा द्यावा असे त्याच्या रुक्ष झालेल्या मनाला का नाही वाटले? माझी किती इच्छा होती की त्याच्या गळयात पडून धाय मोकलून रडावे, त्याच्या छातीवर बुकक्या मारून मारून विचारावे, की का? का? असा वागलास माझ्याशी? पैशासाठी असा धोका देऊ शकतोस तू? या जगात या पुढे कोणीही प्रेमावर विश्वास ठेवूच नये. प्रेम बीम काही नसतं. सगळं खोटं. आणि ती खिडकीतून बाहेर बघत रडू लागली.

बॉस : पूजा, आर यू कमफरटेबल? काही त्रास होतोय का तुम्हाला? कम ऑन, दोनच दिवसांचा तर प्रश्न आहे हा?

पूजा : सर , दोनच दिवस? म्हणजे ?

बॉस : दोन दिवसांनी माझी हिटलर बायको परत येईल. तिला नाही आवडणार हे सारे, ती फार कडक आहे. नंतर तुमची व्यवस्था मी फार्म हाऊस वर करू शकतो. ठीक आहे ना ?

पूजा मनात बॉस ला इतक्या शिव्या देत होती. हलकट, नीच, साला. माझ्या वयाची मुलगी असेल याला, आणि ..... याला आत्ता म्हातारचळ भरलंय. अस वाटतंय याचा इथेच गळा दाबून खून करावा. पण मी इतकी भ्याड आहे? ना माझ्यात आत्महत्या करण्याचे साहस, ना कुणाच्या नरडीचा घोट घेण्याचे साहस? मी या गोष्टीला प्रतिकार का नाही करत आहे? मला खूप गळून गेल्यासारख झालंय. जीवच नाही अंगात आणि आत्माही नाही. मी म्हणजे एक जीवंत प्रेत. भूत म्हणूनही कोणी घाबरणार नाही. मी काहीच नाही, मी एक शून्य आहे शून्य.

तेवड्यात जोरात हॉर्न ऐकायला येतो. पूजा दचकते. “उतरा मॅडम, आले घर. तुमचे सामान वरच्या रूममध्ये नेऊन ठेवेल नानू. तुम्ही चेंज करा, आणि फ्रेश व्हा, मी जेवण वरतीच पाठवतो.” बॉस बोलले.

पूजा “हं” म्हणून उतरली आणि शून्य नजरेने चालत वर गेली. रूम स्वच्छ होती. सुंदर रूम फ्रेशनरचा सुवास दरवळत होता. स्वच्छ गुलाबी रंगाचे बेडशीट, डबल बेड, टीव्ही, डीव्हीडी प्लेयर सारे काही, सुंदर. समोरच्या भिंतीवर बाजीराव मस्तानीची शृंगार रसाने भरलेली एक मोठी पेंटिंग लावलेली. एसी चालू होता. एकूणच वातावरण खूप प्रसन्न ठेवले होते. सुंदर गुलाबाची फुले एका फ्लॉवरपॉटमध्ये सुशोभित केली होती. पूजा शून्यातच पहात राहिली. तिला तेथून पळून जावे असा विचार आला. पण तोच गंभीर प्रश्न “जाणार कुठे?”

ती तोंड धुवायला बेसिनजवळ गेली. तोंड धुतले. तिला थोडे फ्रेश वाटले. तिचे विचार आता पळवाट शोधत होते. बॉसला काही बोला, तर हातची नोकरी घालवायची. नोकरी आहे म्हणून निदान खाण्याचा तर प्रश्न नाहीये, नोकरी गेल्यावर तर भीकच मागावी लागेल. ते काही नाही, बॉस जवळ जवळ साठीचा आहे .तो आला की त्याच्या पायावर रडत रडत लोळण घ्यायचे. आणि थोडे इमोशनली ब्लॅकमेल होतो का ते पाहू. उद्या एखाद्या हॉस्टेलवर रूम पाहून तिथे जाता येईल.

रवी कुठे असेल? काय करत असेल? काय करत असणार म्हणा! मजेत असणार तो अठरा लाख रुपये गिळून. दगाबाज साला.

तेवढ्यात नानू जेवण घेऊन आला. जेवण ठेवून तो निघून गेला. पोटात भुकेणे डोंब उसळला होता. पण खाण्याची इच्छा होईना. तिने त्यातला फक्त भात खाल्ला. आणि पोळी भाजी गपचूप आपल्या पर्समध्ये एका प्लॅस्टिक पिशवीमध्ये भरले. चला उद्या सकाळचा प्रश्न सुटला. हात धुतला.

वर कोणीतरी येत असल्याचा आवाज तिला आला. ती सावध होते. बॉस आत येतात. एकदम फ्रेश. डार्क चॉकलेटी रंगाचा सिल्कचा नाईटसूट. मस्त डीओचा वास. ते आत येताच पूजा तिच्या जागेवरून उठली आणि त्यांच्या पायावर डोके ठेवून रडायला लागली आणि म्हणाली “सर, प्लीज सर, मी तुमच्या .....”

ती पुढे काही बोलणार तेवढ्यात त्यांचा मोबाइल वाजला. तिला थांब असा इशारा करून ते मोबाइल खिशातून बाहेर काढला. त्यावर “रीना कॉलिंग “ असे ब्लिंक होत होते. ते मोबाइल वर बोलू लागले. “हा बोल

रीना ......... हो आहे ना ती इथेच आहे ........... हा मग? ................. तू बावळट आहेस ...........पण ती बावळट नाही तुझ्यासाखी. तुझ्या या फालतू चुकीचे सोडच, पण वरचा ब्रम्हदेव खाली येऊन जरी तिला ही गोष्ट म्हणाला असता ना तरी तिने कधीच मान्य केले नसते. तिचा आभाळा एवढा विश्वास आहे रवीवर. आणि तो अशा आलतू फालतू अडचणींनी डगमगणारा नाहीये. ठीक आहे ठेव आता. आधीच ती बिचारी दमलीये खूप झोपू देत तिला."

फोन कट.

"काय झाले सर?" पूजाने लगबगीने विचारले. तर सर म्हणाले" ती बावळट रीना. तिची टायपिंग मिस्टेक आहे म्हणून आत्ता ... आत्ता सांगत होती. जसे काही तुम्हाला कळलेच नसावे असे, बावळट कुणीकडची? युसलेस लेडी "

पूजा : कोणती मिस्टेक सर?

सर : पूजा पाहिलंत! टेंशन मध्ये तुमच्या लक्षातही नाहीये तिने काय चूक केली होती ते. त्या बावळट रीनाने "निवारा" असे टाइप करायचे सोडून चुकून "नवरा" असे टाइप केले होते. किती बिनडोक आहे पहा ती आणि तेही आता सुचले तिला सांगायचे. मला म्हणाली ती की , ती तुम्हाला सांगायला आली होती तुमच्या टेबल वर. पण तुम्ही घरी निघून गेला होतात तो पर्यन्त. आणि तुमचा मोबाइल पण लागत नव्हता म्हणाली. हो खरे, कुठे आहे तुमचा मोबाइल? आणि मी ही तुम्हाला हेच सांगायला आलो होतो, की तुमचा मोबाइल रवीला पण नॉट रीचेबल आहे. तो केव्हाचा प्रयत्न करतोय त्यावर. ते येतच आहेत इथे एक तासात. त्यांनी शेजारच्याच बिल्डिंगमधला एक फ्लॅट बूक केलाय. बुकिंगचे पैसे मी दिलेत त्यांना ३ लाख रुपये मगाशी. बाकीचे पैसे ते गावाकडची शेती विकून देणार आहेत. म्हणाले आणि हो माझेही पैसे परत देणार आहेत. त्यामुळे कृपया माझे उपकार वगैरे आहेत असा संकोच मनात बाळगू नकात. पूजा, खरे सांगू, माझी मुलगी किंवा मुलगा कोणीही असते न तर तुमच्यएवढेच असले असते. सुखी रहा बाळ.

पूजाच्या डोळयातून आनंदाश्रूंचे उधाण आले होते आणि सोबतच स्वतःच्या अपराधी विचारांनी रडूही येत होते. पण ही वावटळ आता शांत झाली होती.

# विजयलक्ष्मी आणि सावकार

कर्नाटक प्रांतात बेलूर मधली ही गोष्ट आहे. तिथे चिन्नास्वामी नावाचा एक गरीब शेतकरी राहत होता. त्याच्या पत्नीचे नाव होते सत्यवती, त्या दोघांना एक मुलगी होती. तिचे नाव होते विजयलक्ष्मी. चिन्नास्वामी गरीब असला तरी खूप कष्टाळू आणी प्रामाणिक होता. आईवडिलांचे छत्र लहानपणीच हरवल्याने त्याचा सांभाळ आजी आणि मामाने केला होता. जमेल तेवढे त्याचे शिक्षण करून त्याला आपल्या जवळील थोडी शेती मामाने देऊ केली होती. शेतीवरच त्याची उपजीविका चाले. आजी आणि मामाच्या मागे चिन्नास्वामीच सर्व शेती पाहू लागला.

एका वर्षी पाऊस न पडल्याने भीषण दुष्काळ पडला होता. शेतकऱ्याचे फार हाल झाले. पाणी नाही, त्यामुळे शेतात पिकेपण नव्हती. पिके नसल्याने, खायला काही नव्हते आणि खिशात पैसे ही नव्हते. परिस्थितीवर मात करण्यासाठी त्याने एका बसप्पा नावच्या सावकारकडून थोडे कर्ज घेतले होते आणि शेतजमीन त्याला गहाण ठेवली होती. पंधरा वर्षांपासून चिन्नास्वामी दरवर्षी काही रक्कम सावकारला देऊन कर्जाची रक्कम फेडत असे. त्याने तो हिशेब ही सर्व नोंदवून ठेवला होता.

सत्यवती देखील फार कष्ट करीत असे. शिवणकाम, स्वयंपाक करून ती घर चालवायला आणि सावकाराचे कर्ज फेडण्यास आपल्या धन्याला मदत करीत असे. विजयलक्ष्मी लहानपणापासूनच फार चुणचुणीत आणि हुशार मुलगी होती. समयसूचकता आणि हजरजवाबी ही तिची वैशिष्टे होती. ती रंगाने सावळी होती. पण टपोरे डोळे, सरळ नाक आणि छोटीशी जिवणी यामुळे ती फार रेखीव दिसत असे. तिचे केस खूप दाट होते, कुरुळे असल्यामुळे तिची आई तिची छान घट्ट वेणी घालत असे आणि त्यामध्ये दररोज मोगऱ्याचा गजरा लावत असे. घेरदार परकर, तशाच रंगाचे

ब्लाऊज आणि त्यावर साजेशा रंगाची ओढणी साडीप्रमाणे खोचून लांबलचक पदर घेणे हा तिचा पेहराव तिला खूप शोभून दिसे. यालाच हाफ साडी असेही म्हणतात. ती लहान असताना देखील घरातील परिस्थिती अतिशय बेताची असे.

एकदा एक साधू त्यांच्याकडे आले आणि म्हणाले, “मला तुमच्याकडे पिण्यासाठी एक पेला भरून दूध मिळेल काय?” अर्धा पेला दूध सुद्धा घरात शिल्लक नव्हते. त्यांना “नाही “ म्हणणे हे सत्यवतीच्या जिवावर आले होते. पण वेगळे दूध आणावयास पैसे देखील नव्हते. त्यामुळे नाइलाजाने सत्यवती आलेल्या पाहुण्याला रिकाम्या हाताने परत पाठविणार होती. तिच्या डोळयात पाणी आले. मन भरून आले. आणि चेहऱ्यावर दुर्बलतेचे भाव उमटले. विजयलक्ष्मीने आपल्या आईच्या मनातील घालमेल ओळखली. आता सत्यवती साधूबाबांना ‘नाही’ म्हणणार तितक्यात विजया बोलली, “थांबा गुरुदेव, मी आताच तुमच्याकरिता एक पेला दूध घेऊन येते.” ती आत गेली आणि आपल्या इवल्या इवल्या हातामध्ये तिच्या भातुकलीच्या खेळण्याच्या पेल्यात भरून दूध घेऊन आली. आणि त्यांना नमस्कार करून

म्हणाली “महाराज, आमच्या कडे मोठा पेला भरून दूध आणण्यासाठी पैसे नाहीत. पण या पेल्यात भरून दूध देण्याइतके मोठे मन अवश्य आहे. कृपया याचा स्वीकार करून आम्हाला धन्य करा. “त्यांना तिचे कौतुक वाटले. त्यांनी तिला आशीर्वाद दिले. आईलाही तिचा अभिमान वाटला.

विजयलक्ष्मीला गायनाची दैवी देणगीच मिळाली होती. ती बेलूरच्या केशव मंदिरात दर शनिवारी भजन गायला जात असे. ती जेव्हा “ भाग्यदा लक्ष्मी बारम्मा, नम्मम्मा नि सौभाग्यदा लक्ष्मी बारम्मा’ हे गीत गात असे तेव्हा सारे लोक मंत्रमुग्ध होऊन ऐकत असत. “पवमान जगद प्राणा, संकरुशणा, भवभयारण्या दहनाम, पवमान”, “बंदानो गोविंदा, सुंदरीया मंदिरक्के नंदन क्न्दा” या भजनांनी तर जन भावुक होऊन जात असत.

विजयलक्ष्मी हळूहळू मोठी होऊ लागली. वयात येताच ती फार देखणी दिसू लागली. तिचा आवाज आणखी मधूर झाला होता. तिच्या वागण्यात नम्रपणा होता. कोणतेही कष्ट करण्याची तीची नेहमी तयारी असे. गरीबी असूनही ती नेहमी आनंदी रहायची. तिने भजन गायल्यावर कोणी कोणी खुश होऊन तिला बक्षिस म्हणून पैसे देत असत, ती त्यातील एक रूपया

देवाला वाहे आणि आपल्याला लागणार एवढे पैसे ठेवून राहिलेले सर्व पैसे मंदिराबाहेरच्या गरीब आणि गरजू लोकांना वाटून देत असे.

आता सावकाराच्या कर्जाचा शेवटचा हप्ता राहिला होता. तो देताच चिन्नास्वामीची गहाण ठेवलेली शेती सुटणार होती. त्याने ती रक्कम बाजूला कडून ठेवली होती. पण तो खूप आजारी पडला. त्याला बाहेर जाणे शक्य होत नव्हते. तो अंथरुणावर खिळून होता. सावकाराने नोकरासोबत निरोप पाठविला. तेव्हा त्याला जाणे शक्य नाही म्हणून त्याने आपली पत्नी सत्यवती आणि मुलगी विजयलक्ष्मी दोघींना पैसे घेऊन सावकाराकडे पाठविले आणि सोबत सांगीतले, “सावकारास म्हणा ’तुम्ही आम्हाला वेळेला मदत केलीत, तुमचे फार फार उपकार झाले, आता आपल्या कर्जाचा हा शेवटचा हप्ता आहे. कृपया हा घेऊन आमच्या जमिनीची कागदपत्रे आम्हाला परत करावीत. हा व्यवहार तर पूर्ण होईल, परंतु आपला ऋणानुबंध कायम राहील, आम्ही भविष्यात आपल्या काही उपयोगास येणार असेल तर अवश्य सांगा, आम्ही आनंदाने धावून येऊ”.

सांगितल्याप्रमाणे मायलेकी सावकाराकडे आल्या. सावकार बाहेर आले. त्यांनी सत्यवतीला ओळखले आणि येण्याचे कारण विचारले. तेव्हा तिने संगितले “माझे यजमान खूप आजारी आहेत, त्यामुळे तुमचे पैसे परत करण्याकरिता मी आले आहे.” सावकाराने विजयलक्ष्मीकडे पाहत विचारले “ही कोण?” सत्यवती म्हणाली “ही आमची मुलगी आहे सरकार, विजयलक्ष्मी”. तिचे सौंदर्य पाहून सावकार भुलला. त्याला पुढे बोलणेच सुचेना. तो तिच्यावरच आपली दृष्टी खिळवून बसला. ती त्याच्या मनात बसली. त्याने मनात विचार केला “काय सुंदर मुलगी आहे ही , हिच्याशी माझा विवाह झाला तर ... ! आहाहा”. असा कपटी विचार मनात करून म्हातारा सावकार म्हणाला “सत्यवती, तू माझ्या बहिणीप्रमाणे आहेस, आधी चिंनस्वामीला पूर्ण बरे वाटू देत, मग तू आमचे पैसे आम्हाला दे.” ठीक आहे म्हणून त्या दोघी तेथून निघून गेल्या. पण सावकाराच्या मनात वेगळीच कपटी योजना चालली होती. तो दोन तीन दिवसांनी चिन्नास्वामीच्या घरी गेला आणि म्हणाला, “चिन्नास्वामी, आता बरे वाटते

आहे का? नसेल वाटत, तर  शहरातील उपचार करून घे. माझे पैसे नंतर दे, पुढच्या महिन्यात.”

चिन्नास्वामीला एक महिन्यात पूर्ण बरे वाटले. आता तो पैसे घेऊन सावकाराकडे गेला आणि म्हणाला “ तुम्ही आम्हाला वेळेला मदत केलीत, तुमचे फार फार उपकार झाले,  आता आपल्या कर्जाचा हा शेवटचा हप्ता आहे. कृपया हा घेऊन आमच्या जमिनीची कागदपत्रे आम्हाला परत करावीत. व्यवहार पूर्ण होईल, परंतु आपला ऋणानुबंध कायम राहील, आम्ही भविष्यात आपल्या काही उपयोगास येणार असेल तर अवश्य सांगा , आम्ही आनंदाने स्वीकारू”.

सावकार म्हणाला “असे असेल, तर मग तुझी मुलगी विजयालक्ष्मीचा माझ्यासोबत विवाह करून दे.” चिन्नास्वामी म्हणाला “सरकार, ती तुमच्या मुलीच्या वयाची आहे जी, आपण काय विपरीत सांगत आहात? हे शक्य नाही. मला माझ्या जमिनीचे कागद परत करावे. म्हणजे मी निघतो.”

त्यावर कपटी सावकार म्हणाला, “तू एक महिना उशिरा कर्ज फेडावयास आला आहेस, त्यामुळे आठ दिवसांत मागील पंधरा वर्षांचे चक्रवाढ व्याज दे आणि मगच तुझी शेतीची कागद पत्रे घेऊन जा.”

दु:खाचा डोंगर छातीवर घेऊन चिन्नास्वामी घरी गेला. त्याने सर्व कथा घरी सांगितली. सत्यवतीवर तर आभाळच कोसळले. ती आपल्या पतीला म्हणाली, “आपली ही फुलासारखी पोर अशा या धूर्त म्हाताऱ्याच्या गळयात बांधावी, त्यापेक्षा जीव देणे चांगले”.

विजया ने त्यांचे हे बोलणे ऐकले. ती म्हणाली “अप्पा, अम्मा, घाबरू नका, काहीतरी मार्ग निघेलच. सावकारचा सामना करू. त्याची लबाडी सर्वांसमोर आणू. आपण अन्याय का सहन करावा अप्पा?”

दुसऱ्या दिवशी सावकाराचा नोकर परत तिथे आला, त्याने निरोप सांगितला, “आज दुपारी तुम्हाला तिघांनाही, सरकारांनी त्यांच्या वाड्यावर बोलावले आहे. नाहीतर तुमची जमीन जप्त करण्यात येईल अशी चेतावणी त्यांनी दिली आहे.

चिन्नास्वामी आणि सत्यवतीला तर काहीच सुचत नव्हते. एकीकडे गरीबी, जगण्यासाठी लढा. दुसरीकडे आपली गोड निरागस सुंदर कन्या; तिला जगवण्यासाठी लढा. विजयलक्ष्मी म्हणाली "अप्पा, चिंता सोडा, वेळ आलीच तर मी त्या सावकाराशी आनंदाने विवाह करेन, पण आपली जमीन ही परत मिळालीच पाहिजे."

हे तिचे बोल ऐकून चिन्नास्वामी खचून गेला. दुपारी तिघेही सावकाराच्या वाड्यावर गेली. सावकार चिन्नास्वामीजवळ आतुरतेने आला आणि म्हणाला, "तू आमचे म्हणणे तुझ्या सुंदर मुलीला संगीतलेस काय?" चिंन्नास्वामिने मानसुद्धा वर काढली नाही. मग सावकार विजयाजवळ गेला "तिला म्हणाला "सुंदरी, आमचे तुझ्यावर प्रेम जडले आहे, तू आमच्याशी विवाह करावास अशी आमची इच्छा आहे. तुझी पण तशीच इच्छा आहे ना!"

सत्यवती जोरात ओरडली "अरे धूर्त मनुष्या, आमच्या गरिबीचा किती गैरफायदा घेशील?" आम्ही पै पै करून तुझे सारे कर्ज फेडले आहे. पापी मनुष्या, तुझी घाणेरडी नजर माझ्या मुलीवर टाकू नकोस."

विजया बोलली “अम्मा, असा त्रागा करून घेऊ नकोस, सावकारजी, माझी तुमच्याशी विवाह करण्याची तयारी आहे. पण तुम्ही कपटी आहात. हा न्याय नाही. कपटी वृत्तीने माझ्या आईवडिलांची शेतीचा सहारा घेऊन तुम्ही माझ्याशी विवाह केलात तर माझे आई वडील कधीच सुखी राहणार नाहीत. मग त्यामुळे मीही कधीच खुश राहू शकणार नाही. मग आपल्या विवाहाला काय अर्थ राहील? उगाच एखाद्या मूर्तीबरोबर विवाह केल्याची जाणीव तुम्हाला सतत होत राहील. त्यापेक्षा तुम्ही त्यांची जमीन त्यांना देऊन टाका आणि अशी काहीतरी गोष्ट सांगा की मी तुमचा विवाहाचा प्रस्ताव मंजूर करावा.”

सावकाराने मनाशी विचार केला की एवढीशी गोष्ट माझी बदनामी होण्यासाठी पुरेशी आहे. काहीतरी वेगळी युक्ति करायला हवी. त्याने त्या तिघांना वाड्याच्या मागच्या अंगणात नेले. तिथे अंगण भरून लिंबे पसरली होती. त्याच्या बागेतील लिंबे हिरवी पिवळी रंगाची लिंबे अस्ताव्यस्त पसरली होती. त्याला एक कपटी युक्ति सुचली. तो म्हणाला “मी थोडे तुझे म्हणणे मान्य करतो. तू माझे थोडे म्हणणे मान्य कर.”

चिन्नास्वामी म्हणाला “सावकारजी, मी तुमची आयुष्यभर गुलामी करेन, कृपया माझ्या मुलीला या व्यवहारात ओढू नका. मी तुमची सर्व रक्कम व्याजासकट परतवली आहे, कृपया माझी शेती मला परत द्या.”

सत्यवती म्हणाली “होय सरकार! आम्हा गरिबावर असा अन्याय करू नका. पाहिजे तर आमची अर्धी शेती तुम्ही ठेवून घ्या. पण माझ्या मुलीला या मध्ये ओढू नकात. कृपया याचा विचार करा की ती तुमच्या मुलीच्याच वयाची आहे.”

सावकार चिडून ओरडला “गप्प रहा! मी सांगतो तेच होईल” असे म्हणून त्याने एक चंची बाहेर काढली आणि म्हणाला “मी यात एक पिवळे आणि एक हिरवे लिंबू टाकणार. सत्यवती विजयालक्ष्मीच्या डोळयांवर रुमाल बान्धेल. मग विजया आपल्या बंद डोळयांनी यातील एक लिंबू उचलेल. जर तिने पिवळे लिंबू उचलले तर मी तुमचे सारे कर्ज माफ करून तुमचे सर्व शेत तुम्हाला परत देईन. आणि तिला माझ्याशी लग्नही करावे लागणार नाही. पण जर तिने हिरवे लिंबू उचलले तर मात्र तुमचे सारे शेत माझे. तुम्ही दोघेही आयुष्यभर माझे गुलाम राहाल. आणि मंजूर नसेल तर तेव्हाच

तुम्हाला दोघांनाही ठार मारणार. आणि मी विजयलक्ष्मीसोबत विवाह करणार. चल सत्यवती! बांध डोळे विजयाचे.”

सावकार चंची घेऊन त्यात लिंबू टाकायला गेला. सत्यवती तिच्या डोळ्यांवर रुमाल बांधणार तेवढ्यात तिच्या चाणाक्ष डोळ्यांनी हे निरीक्षले की धूर्त सावकाराने चंचित दोन्ही हिरवेच लिंबू टाकले.

आता काय? काय केले असेल बरे विजयाने? सावकाराला शेतीचे काहीच पडले नव्हते. पण त्याला विजया हवी होती. त्याने परत कपट रचले होते. आता विजयाने काय करायचे होते? काही बोलावे तर तो म्हणाला असता की तू सारे रुमालातून पाहत आहेस. आणि त्याची शिक्षा अप्पा अम्माला झाली असती.

विजयाने आपल्या अम्माला संगितले की मला नेऊन लिंबांच्या ढीगऱ्याच्या मधोमध उभे कर. तिने तसेच केले. सावकाराने तिच्या हातात चंची दिली. आणि एक लिंबू काढायला संगितले. ती हिरवेच लिंबू

उचलणार म्हणून तो बिनधास्त होता. त्याचे  तिच्याकडे लक्षच नाही अशा आविर्भावात तो उभा राहिला.

इकडे तिच्या अप्पा अम्माच्या हृदयाची धडधड वाढतच चालली होती. विजयाने चंचित हात घातला. एक लिंबू उचलले आणि झरकन खाली ढीगऱ्यात  फेकले .  आणि म्हणाली " अरेरे मी उचललेले लिंबू तर खाली पडले, आता कसे?"

सावकार तिच्यावर ओरडू लागला. "तू इतकी वेंधळी कशी? तू लिंबू खाली पाडलेस आता येवढ्या मोठ्या ढीगात तू उचललेले लिंबू शोधणार कसे?  बावळट कुणीकडची"

तिने डोळ्यावरची पट्टी काढली आणि म्हणाली " सरकार, ते लिंबू चुकून खाली पडले.  पण चंचित जे दुसरे लिंबू आहे. त्यावरून आल्याला सहज कळेल की मी कोणत्या रंगाचे लिंबू उचलले होते.  जर मी हिरवे उचलले असेल तर यात पिवळे असेल आणि जर पिवळे उचलले असेल तर यात हिरवे असेल". सावकार " थांब थांब.." म्हणेपर्यंत तिने चंचितून दुसरे लिंबू

बाहेर काढले. ते हिरवेच असणार होते. हे तिला आणि सावकारालाही ठाऊक होते.

ते हिरवे लिंबू पाहून मोठा आनंद झाल्यासारखे करून ती म्हणाली, “सरकार मी आधी पिवळे लिंबू उचलले असणार, म्हणूनच येथे हिरवे लिंबू शिल्लक आहे. आता माझ्या आप्पांच्या जमिनीची कागद पत्रे परत द्या.” सावकाराने अतिशय लज्जित मनाने चिंनस्वामीला त्याच्या जमिनीचे कागद परत दिले.

## वाचक मित्रांनो

प्रत्येक भाषिकांचे काही स्वभाव असतात. म्हणजे गुजराथी म्हणजे व्यवसाय, पंजाबी म्हणजे शौर्य, बंगाली म्हणजे बंडखोरी, मारवाडी म्हणजे कंजूषी वगैरे वगैरे.

तसा मराठी भाषिकांचा स्वभाव आहे विचारी. नवे विचार. किंवा जुने लोकांनी टाकावू म्हणून टाकून दिलेले विचार. सुधारकी किंवा सनातनी. डावे किंवा उजवे. किंवा मध्यम. खेळ किंवा कला. मराठी माणूस सर्वच आघाड्यांवर सर्वाधिक विचार करतो. साऱ्या संस्था, सारे पक्ष, सगळया संघटना यांचा जन्म महाराष्ट्रातच झाला. मग ते कॉंग्रेस असो, वा भाजप वा संघ वा कम्युनिस्ट. कर्वे, आगरकर असो वा टिळक, सावरकर. डांगे, रणदिवे असो वा हेडगेवार, गोळवलकर. आणि चाफ़ेकर, राजगुरू असो वा विनोबा, सानेगुरुजी. फ़ुले, आंबेडकर. साऱ्या विचारांचे जन्मस्थान महाराष्ट्रच आहे.

हा केवळ योगायोग नाही. कारण महाराष्ट्राच्या मातीत आणि पाण्यात काही खासियत आहे. मुळा,मुठा आणि गोदावरीच नव्हे तर कोयना, गोदावरी, कावेरीच्या पाण्यातून विचारांचे वादळ जन्माला घालण्याचे सामर्थ्य आहे. सह्याद्रीच्या कातळात बलदंड विचारांचे विशाल स्तंभ उभे करण्याची ताकद आहे. ही ताकद आहे तुमच्या आमच्या मनात. तुमच्या आमच्या विचारांत आहे.

चला तर या महाराष्ट्रभर पसरलेल्या या विचारांचे स्वागत करू या. वाचन करू या. लिहू या. नव्या वाचकांना या चळवळीत सामिल करू या. काही भव्य उभारू या! महाराष्ट्री जन्मास आल्याप्रमाणे... महादिव्य हातून काही घडवूया. वारसा पुढे नेऊ या. इंटरनेटच्या युगात मराठी नेटवर्क उभारूया.

तुम्हीही बसल्या बसल्या खूप काही करू शकता. लिहू शकता. वाचू शकता.षी चळवळ पुढे नेऊ शकता. नवीन आठ ते दहा वाचकांचे ई मेल आयडी आम्हाला पाठवा. आपल्या आप्तेष्टांचे मित्रांचे ई मेल आय डी आम्हाला माठवा. लग्नाच्या वेळी याद्या करता ना. तशा याद्याच करा. आपल्या आप्तेष्टांच्या. आणि त्यांना या भव्य चळवळीत सामिल करा.

चलो सारे दुनिया को दिखाते हैं. मराठी क्या चीज है!

दाखवूच सगळयांना! काय म्हणता?

पाठवा आपल्या आठ मराठी मित्रांचे किंवा मैत्रिणींचे ई मेल आयडी. esahity@gmail.com या पत्त्यावर.

आपले मित्र...

ई साहित्य प्रतिष्ठान